# दोन शब्द



पू. विनोबाजी भावे यांनीं १९३२ मध्यें धुळें तुरुंगांत दर रविवारीं एका अध्यायावर एक अशीं श्रीमद्भगवद्गीतेच्या अठरा अध्यायांवर अठरा प्रवचनें दिलीं होतीं. मीं तेथें तीं सारीं प्रवचनें विस्तृतरूपानें लिहून घेतलीं होतीं. १९३८–३९ मध्यें मीं माझ्या ' कॉंग्रेस ' नांवाच्या साप्ताहिकांतून हीं सारीं प्रवचनें छापून काढलीं होतीं. तीं तपासून पू. विनोबाजी ग्रंथरूपानें प्रसिद्ध करणार होते. दोन अध्याय तपासून ते पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले गेले. पुढचे तसेच राहिले. वैयक्तिक सत्याग्रहापासून त्यांना वेळच मिळाला नाहीं. मीहि तुरुंगांतच होतों. विनोबाजींच्या या प्रवचनांचा सारांश महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं मीं रोज १॥–२ तास याप्रमाणें तीन दिवसांत सांगितला आहे. मित्र म्हणत, बंधुभगिनी म्हणत, " हा सारांशच द्या ना लिहून. संपूर्ण प्रवचनांची पवित्र गंगा मिळेपर्यंत हा लहानसा सारांशरूप झरा आम्हांला द्या." पू. विनोबाजींना मनांत भक्तिप्रेमानें स्मरून व प्रणाम करून एके दिवशीं मी सारखा बसलों व सारांश लिहून काढिला. तो मित्रांच्या हवालीं केला व म्हटलें, " हा घ्या. यांतील सत्यता व सुंदरता पू. विनोबाजींची आहे. यांत जें कांहीं चुकीचें असेल तें माझें आहे. तुम्ही याचें कांहींहि करा. मी निमित्तमात्र आहें. माझें लक्ष पू. विनोबाजींचीं तीं पवित्र प्रवचनें संपूर्ण कधीं प्रसिद्ध होतील तिकडे आहे. तोंपर्यंत दुधाची तहान तुम्ही या गरिबाच्या ताकावर भागवा."

— साने गुरुजी

# अध्याय १ ला

महाभारत व रामायण हे आपले राष्ट्रीय ग्रंथ आहेत. हीं दोन महाकाव्येंच आहेत असें नव्हे, तर हीं काव्यें आपल्या जीवनाशीं एकरूप झालीं आहेत. राम, लक्ष्मण, सीता, कृष्ण, अर्जुन, द्रौपदी वगैरे आपल्या जीवनांत मिळून गेलीं आहेत. जगांतील इतर देशांतहि महाकाव्यें आहेत; परंतु त्या त्या देशांतील महाकाव्यांतील पात्रें त्या त्या देशांतील जीवनाशीं अशीं एकरूप झालेलीं दिसत नाहींत. रामायण व महाभारत या दोन ग्रंथांनीं भारतीय जीवन बनविलें आहे. वाल्मीकींची प्रतिभा, व्यासांची प्रज्ञा व शुकाचार्यांचें वैराग्य यांना जगांत तुलना नाहीं. रामायणांत प्रतिभेचा अपूर्व विलास आहे, काव्यशक्तीची पराकाष्ठा आहे; परंतु महाभारतांत जणुं विश्वदर्शन आहे. व्यासांची प्रज्ञा सर्व संसाराचें अंतर्बाह्य दर्शन घडवीत आहे. महाभारतांत थोरामोठ्यांचेहि दोष दाखविले आहेत. येथें दुष्टांचे गुण दाखविले आहेत, सज्जनांच्या उणीवा दाखविल्या आहेत. येथें धर्मराजहि 'नरो वा कुंजरो वा' करतो; कृष्णाचा हातांत शस्त्र न धरण्याचा गर्व गळतो; कर्णाची उदार शूरता दिसते; मांडी मोडून पडलेल्या दुर्योधनाचा बाणेदारपणा दिसतो. असें हें एक प्रकारचें भव्य दर्शन आहे. जगांत केवळ निर्दोष एक परमेश्वर आहे.

व्यासांनीं अठरा पुराणें लिहिलीं; महाभारत लिहिलें. सागराप्रमाणें अगाध व अनंत असें त्यांचें हें वाङ्मय आहे. सामान्य मानव हें सारें केव्हां वाचणार, केव्हां पाहणार? व्यासांनीं आपला संदेश थोडक्यांत सुटसुटीतपणें कोठें नाहीं का सांगून ठेवला? शेंकडों कथा, आख्यानें, उपाख्यानें, शेंकडों उपदेश यांतून त्यांनीं जें सांगितलें त्याचा सारांश, त्याचें नवनीत, त्यांनीं कोठें काढून दिलें आहे का? होय, त्यांचा संदेश श्रीमद्भगवद्गीतेंत आहे. व्यासांच्या सर्व शिकवणीचें सार म्हणजे श्रीगीता होय.

हिंदुधर्माचा सुटसुटीत असा एक ग्रंथ सांगा असें कोणीं म्हटलें, तर गीता आपण पुढें करूं. हिंदुधर्मांतील सर्व उदात्त भावनांचा व विचारांचा हा साररूप ज्ञानकोश आहे. अमुक एक विचार येथें आला नाहीं असें नाहीं. गीता किती लहान! फक्त सातशें श्लोक! परंतु वामनाच्या एका पावलांत सर्व त्रिभुवन

थावें त्याप्रमाणें सारें तत्त्वज्ञान या सातशें श्लोकांत आलें आहे. चंद्रबिंब बचके-एवढें दिसलें तरी साऱ्या पृथ्वीला धवळितें, त्याप्रमाणें ही लहानशी गीता सर्व मानवी संसाराला प्रकाश देत आहे.

महाभारताच्या मध्यभागीं गीतेचा हा नंदादीप, हा दीपस्तंभ उभा आहे. महाभारताचीं अठरा पर्वे, गीतेचेहि अठरा अध्याय. अठरा अक्षौहिणी सैन्याच्यामध्यें गीता जन्मली. श्रीकृष्णांनीं गीता सांगितली, अर्जुनानें ती ऐकिली, व्यासांनीं ग्रथिली. या तिघांची जणुं एकरूपता झाली आहे. व्यासांना कृष्णद्वैपायन म्हणतात. अर्जुनालाहि कृष्ण नांव आहे. सारेच जणुं कृष्णमय झाले.

अर्जुनानें आपल्या रथाचे दोर श्रीकृष्णाच्या हातांत दिले होते; परंतु त्याच्याहि आधीं त्यानें आपल्या मनाचे दोर त्याच्या हातांत दिले होते. अर्जुन या शब्दाचा अर्थ काय? जो ऋजु आहे तो अर्जुन. ऋजु म्हणजे सरळ. अर्जुनाचा सरळ भाव, शुद्ध भक्ति. जो सरळ व निर्मळ मनाचा असतो, तो हृदयांतील श्रीकृष्णाला शरण जातो. कृष्ण म्हणजे कर्षून घेणारा, ओढून घेणारा, इंद्रियांना सन्मार्गावर ठेवूं पाहणारा. ज्ञानस्वरूप अंतरात्मा म्हणजेच कृष्ण. कृष्ण म्हणजे केवळ शुद्ध असें ज्ञानस्वरूप. या शुद्ध विचाराची वाणी कोण ऐकतो? जो ऋजु आहे, शुद्ध वृत्तीचा आहे तो ऐकतो.

अर्जुन युद्धासाठीं प्रवृत्त झाला होता. तो महावीर होता. त्याला "नर" अशी श्रेष्ठ पदवी होती. असा हा अर्जुन श्रीकृष्णाला माझा रथ हांक, बघूं दे कोण कोण युद्धार्थ उभे आहेत, असें म्हणतो. भगवान् रथ हांकतात. अर्जुन उभा राहून सर्वत्र पाहतो. त्याला सारे स्वजन दिसतात. आप्त, सखेसोयरे, गुरू दिसतात. मारणमरणाच्या निश्चयानें ते सारे जमलेले असतात. ती मामुली लढाई नव्हती. अखेरची सोक्षमोक्षाची लढाई होती; अटीतटीची लढाई होती. तें दृश्य पाहून अर्जुन दुःखी होतो. युद्ध ही अति भयंकर वस्तु आहे असें त्याला वाटतें. त्याच्या डोळ्यांतून पाणी येतें. त्या धनुर्धराचें धनुष्य गळतें. तो देवाला म्हणतो, "देवा, या सर्वांना मारून मिळणारें राज्य काय कामाचें? रक्तानें माखलेले सुखभोग भोगणें पाप आहे. हे सारे आप्तेष्ट कसे मारूं? गुरुजन कसे वधूं? हे लाखों वीरपुरुष मरतील. लाखों मायबहिणी विधवा होतील. व्यभिचार माजतील. कुलधर्म लोपतील. छे! नको हें युद्ध.

संन्यासधर्मच बरा. तोच श्रेष्ठ आहे. खरोखर मीं काय करावें तें मला समजत नाहीं. तूंच गुरु. तूंच मार्ग दाखव."

युद्ध ही अति भयंकर वस्तु आहे यांत शंका नाहीं. अर्जुनानें युद्धामुळें जे अनर्थ होतात म्हणून सांगितलें त्याचा अनुभव मागील महायुद्धांत आला, या महायुद्धांत आणखी शतपटीनें येईल; परंतु अर्जुनाला आलेलें हें वैराग्य खरें होतें का? त्याच्या जीवनांत मुरलेला तो विचार होता का? कालपर्यंत तो युद्धें करीत होता. शत्रूंचीं मुंडकीं चेंडूप्रमाणें उडवीत होता. आतांच अकस्मात् कोठून आलें वैराग्य? तें वैराग्य त्याच्या अनुभवांतून परिणत होऊन आलेलें नव्हतें. अर्जुन क्षत्रियधर्म सोडून कोठें हिमालयांत जाता तर तेथें मृगया करूं लागला असता. तेथल्या जातीजमातींना जिंकून नवें राज्य मिळविता. हिमालयांत इमले उभारता. संन्यासधर्माची ती विटंबना झाली असती. अर्जुनाचीहि ती फजिती झाली असती. भगवान् श्रीकृष्ण हें सारें ओळखीत होते. म्हणून अर्जुनाच्या सर्व म्हणण्याला त्यांनीं "प्रज्ञावाद" असें म्हटलें आहे. आपल्या मनांत जें येतें त्याच्या समर्थनार्थ आपण बुद्धि लढवीत असतों, सत्यासाठीं म्हणून नव्हे. तो प्रज्ञा-वाद असतो. आपण नाना मुद्दे मांडीत बसतों. त्यांत सत्यता नसते. आपलें मनहि आपणांस खात असतें.

एकादा न्यायाधीश असावा. त्यानें आजपर्यंत अनेकांना सहज फांशीची शिक्षा दिली असावी; परंतु एके दिवशीं स्वतःच्या खुनी मुलालाच फांशीची शिक्षा देण्याचें त्याच्या नशिबीं यावें. मग लगेच तो म्हणतो, "ही फांशीची शिक्षा फार वाईट! अपराध्यानें भावनेच्या भरांत कांहीं केलें म्हणून आतां आपण त्याला शांतपणें का फांशी द्यावयाचें? छे! हें अयोग्य आहे." त्या न्यायाधिशासमोर मुलगा असतो. स्वतःचा मुलगा. त्या मोहांतून, त्या आसक्तींतून त्याचें तें वैराग्य जन्मलेलें असतें. तो तात्पुरता जन्मलेला विचार असतो. मोहाला सांवरून धरण्यासाठीं, आसक्तीचें स्वरूप लपविण्यासाठीं तो विचार जन्मलेला असतो.

अर्जुनाचें अगदीं तसेंच आहे. स्वजन व परजन असा तो भेद करतो. आजपर्यंत परजन त्यानें किती तरी मारले; परंतु स्वजन दिसतांच युद्ध वाईट म्हणून तो म्हणतो. ही आसक्ति आहे. हा मोह आहे. कर्तव्य करीत असतां स्वजन, परजन हा भेद करावयाचा नसतो.

अर्जुनाला संन्यासधर्म श्रेष्ठ वाटतो; परंतु तो झेपला पाहिजे ना? आपापल्या वृत्तीप्रमाणेंच अनासक्त राहून समाजसेवा आपण केली पाहिजे. दूध पाण्यापेक्षां जास्त किंमतीचें आहे. आपण जर माशाला म्हणूं, " माशा, तुला दुधांत ठेवतों, पाण्यापेक्षां दूध अधिक मोलवान् आहे," तर तो काय म्हणेल? मासा पाण्यांतच जगेल. दुधांत मरेल. मोरोपंतांनीं म्हटलें आहे :

" यज्जीवन जीवन तो दुग्धीं वांचेल काय हो मीन ? "

म्हणून दुसऱ्याचा धर्म जरी श्रेष्ठ वाटला, तरी तो आपणांस झेपला पाहिजे ना? सूर्याचा प्रकाश चांगला खरा; परंतु आपण त्याच्याजवळ जाऊं तर जळून जाऊं. पृथ्वीवर राहूनच त्याचा प्रकाश घेऊं व वाढूं. पृथ्वीवर राहणें आकाशांत राहण्यापेक्षां कमी प्रतीचें वाटलें, तरी तसें करण्यांतच आपलें कल्याण आहे, आपला विकास आहे.

अर्जुन संन्यासधर्मी होऊं पाहतो. त्याची फजिती होईल हें श्रीकृष्ण जाणतात. म्हणून त्याच्या सर्व बुद्धिवादाला ते " प्रज्ञा-वाद " म्हणतात. अर्जुनाला मारूनमुटकून संन्यासी करण्यांत काय अर्थ? केवळ त्याच्या डोक्यावर हात ठेवूनहि त्याला संन्यासी करणें बरें नव्हे. जो तो स्वतःच्या आंतरिक धडपडीनें ध्येयाकडे जाऊं दे.

सारांश, अर्जुन मोहामुळें, आसक्तीमुळें स्वधर्म टाळूं पाहतो. मोह व आसक्ति जिंकणें ही खरी गोष्ट आहे. अनासक्त होऊन स्वधर्मकर्माचें आचरण करणें हें सर्वांचें कर्तव्य आहे. मोह जिंका व अनासक्त व्हा, असें होऊन स्वधर्मकर्म आचरा, हें शिकविण्यासाठीं गीता जन्मली आहे. अठराव्या अध्यायाच्या शेवटीं " कच्चिदज्ञानसंमोहः प्रणष्टस्ते धनंजय। " अर्जुना, गेला का मोह? असें श्रीकृष्ण विचारतात. अर्जुन उत्तर देतो, " नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा। " मोह गेला, भान आलें, स्वधर्माचरणाची जागृति आली, असें म्हणतो.

कर्तव्यकर्में करीत असतांना जे मोह आड येतात, आसक्ति आड येतात, त्या कशा दूर कराव्या व कसें झगडावें हें सांगण्यासाठीं गीताशास्त्र आहे. पहिल्या अध्यायांत उपदेशाचा आरंभ नाहीं; परंतु अर्जुन कोणत्या भूमिकेवर उभा आहे हें समजण्यासाठीं पहिल्या अध्यायाची जरुरी आहे. गीताशास्त्राची उत्पत्ति कशासाठीं झाली हें कळण्यासाठीं पहिला अध्याय हवा.

गीता ही केवळ अर्जुनासाठीं नाहीं; केवळ क्षत्रियांसाठीं नाहीं. ती तुम्हां-आम्हां सर्वांसाठीं आहे. सर्व सांसारिकांसाठीं आहे. आपण सारे एक प्रकारें क्षत्रियच आहोंत. तुकारामांनीं म्हटलें आहे :

> " रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग
> अंतर्बाह्य जग आणि मन "

रात्रंदिवस आपणां सर्वांच्या जनांत व मनांत झगडा चाललेलाच असतो. प्रत्येकजण आपल्या कर्तव्यकर्माच्या 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे' उभा असतो. तेथें मोह आडवे येतात. आसक्ति आड येते. तेथें झुंजावें लागतें. ते मोह कसे जिंकावे, आसक्ति कशी दूर करावी, हें गीता आपणां सर्वांस सांगत आहे. म्हणून सर्वांना या शास्त्राची जरुरी आहे. उंच डोंगरावर पाऊस पडतो. अर्जुनासारख्या महापुरुषाच्या मस्तकावर श्रीकृष्णांनीं सदुपदेशाची अमृतवृष्टि केली. व्यासांनीं तो प्रवाह बांधून तुम्हां-आम्हां सर्वांसाठीं आणला आहे. त्यांचे थोर उपकार! अर्जुनाला निमित्त करून सर्वांनाच येथें उपदेश केलेला आहे. आपण सारेच ऋजु होऊन, सरळ व निर्मळ होऊन, ज्ञानमय कृष्णा-जवळ बसूं या व मोह जिंकून, अनासक्त होऊन, स्वधर्मकर्म आचरून समाजसेवा कशी करावी व जीवन कृतार्थ कसें करावें तें शिकूं या.



## अध्याय २ रा

दुसऱ्या अध्यायाच्या आरंभीं जीवनाचे महासिद्धान्त सांगितले आहेत. कोणते हे महासिद्धान्त ?

१ आत्मा सर्वत्र भरलेला आहे.
२ देह नाशिवंत आहे.
३ स्वधर्म अबाध्य आहे.

या तीन सिद्धान्तांत जीवनाचें सारें शास्त्र जणुं येऊन गेलें. आत्मा अनंत आहे. एकच तत्त्व जणुं सर्वत्र भरलेलें आहे. आपणांस याचा पदोपदीं थोडा तरी अनुभव येत असतो. आपणांस सुखदुःख होतें तसें दुसऱ्यास होतें. आपण सारे समान, सारखे आहोंत. एकच चैतन्य सर्वांत खेळत आहे. सर्वत्र

भरलेलें हें आत्मतत्त्व पाहणें म्हणजेच मोक्ष. परंतु आपण या आत्मतत्त्वाचें खंड खंड करतों. एकादी मोलवान् पैठणी असावी. एकाद्या लहान मुलानें हातांत कात्री घेऊन त्या पैठणीचे तुकडे तुकडे करावे, तसें आपण करीत असतों. सर्वत्र भरलेल्या आत्मतत्त्वाचे आपण तुकडे करतों. एक सुंदर विणलेलें सणंग, त्याच्या चिंध्या करतों आणि मग अंगावर घ्यायला कांहीं नाहीं म्हणून रडत बसतों ! जगभर जीं दुःखें आहेत, जे अन्याय आहेत, ज्या स्पर्धा आहेत, ज्या मारामाऱ्या आहेत, जीं युद्धें आहेत, त्या सर्वांचें कारण काय ? एकच कारण. आणि तें म्हणजे आपण नाना कृत्रिम भेद निर्माण करीत असतों. सर्वत्र भरलेलें एक आत्मतत्त्व आपण पाहतच नाहीं. नदी वाहती असली पाहिजे, परंतु नदींत ठायीं ठायीं बांध घालून जर आपण डबकीं निर्माण करूं, तर त्यामुळें हिंवताप मात्र येईल. डांस सर्वत्र होतील. आपण मरून जाऊं. आज जगांत आपण सारे मरत आहोंत. कारण आपण डबकीं निर्माण केलीं आहेत. हे म्हणे गोरे, हे काळे; हे हिंदु, हे मुसलमान; हे ब्राह्मण, हे ब्राह्मणेतर; हे स्पृश्य, हे अस्पृश्य; हे देशस्थ, हे कोंकणस्थ; हे महाराष्ट्री, हे गुजराथी; सारीं डबकीं ! आपापल्या डबक्यांत बसून सारे बेडकांप्रमाणें अहंकारानें टरों टरों करीत आहेत. सर्वांवर मरणकळा येत आहे.

ज्या हिंदुस्थानानें गीता दिली, उपनिषदें दिलीं, त्या हिंदुस्थानांत भेदाचा जसा बुजबुजाट झाला आहे. ठायीं ठायीं आपापल्या क्षुद्र जातींचीं डबकीं उभीं करून आपण करंट्यांसारखे भांडत आहोंत.

हीं अशीं डबकीं आपण कां निर्माण करतों ? सर्वत्र भरून राहिलेलें आत्म-तत्त्व आपण कां पहात नाहीं ? कारण नाशिवंत देहालाच आपण महत्त्व देतों. गीता सांगते, अरे, हा देह जाणारा आहे, हें मडकें फुटायचें आहे, हें वस्त्र फाटायचें आहे. या देहाला काय महत्त्व देतोस ? यांतील आत्मा पहा ! परंतु आपण आत्म्याकडे लक्ष देत नाहीं. अमक्या आडनांवाचे, अमक्या रंगाचे ते माझे, असें आपण म्हणूं लागतों. बाह्य रूपरंगांना महत्त्व देऊन डबकीं निर्माण करतों. अरे, उद्यां मेल्यावर एकाच मातींत सारे मिळून जाणार आहांत; ज्या शरीराची एवढी मातब्बरी तुम्हांस वाटते, तें नाशिवंत आहे.

“ आधीं पलंगीं झोंपती
शेवटीं गोवऱ्यांची संगती ”

परंतु विचार करतो कोण ? तुकारामांनीं म्हटलें आहे :

> " एकमेकांचीं रडनें
> पाहतां न होती शहाणे "

सारे शेवटीं मातींत जातात हें पाहूनहि आपण शहाणे होत नाहीं. दुःखाची गोष्ट आहे.

रवीन्द्रनाथांनीं गीतांजलींत एके ठिकाणीं म्हटलें आहे, " या तुरुंगांत एक कैदी आहे. या कैद्याकडे कोणाचेंच लक्ष नाहीं. तुरुंगाच्या भिंतींचीच फक्त काळजी घेतली जाते." आपण या देहांत असलेलें आत्मतत्त्व पहात नाहीं. आपला आत्मा पंख फडफडवून सारीं कृत्रिम बंधनें, खोटे भेदभाव तोडून सर्व विश्वाला मिठी मारूं इच्छितो; परंतु त्याच्या भुकेकडे आपलें लक्ष नाहीं. आपण देहाचीच पूजा करीत बसलों आहोंत. स्वतःच्या देहाची; स्वतःच्या जातीच्या लोकांच्या देहांची. जपानला वाटतें, फक्त जपान्यांनीं सुखांत लोळावें. जर्मनांना वाटतें, जर्मनांची सत्ता असावी. इंग्रजांना वाटतें, आपलें साम्राज्य असावें; परंतु सारे मानव सुखी व स्वतंत्र असूं देत असें कोण म्हणतो? जो तो आपले रंग, आपला देश, आपली जात पहात आहे. बाहेरच्या आकारांना आपण महत्त्व देत आहोंत. शिंपले हृदयाशीं धरीत आहोंत. मोतीं फेकून देत आहोंत ! गीता सांगते, " अरे, सर्वत्र भरलेला परमात्मा पहा. देहाला भुलून अखंड आत्म्याचे खंड पाडूं नका."

हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें भेदांचा बुजबुजाट, त्याप्रमाणें मरणाचाहि अपरंपार डर. इतर देशांनीं मरणाचा जसा खेळ केला आहे. स्वदेशार्थ लाखों मरत आहेत; परंतु आपल्याकडे सारीच भीति ! " लाठी बसेल, गोळी लागेल, तुरुंगांत जावें लागेल " अशी भीति एकमेकांस घालीत असतात. ज्ञानेश्वरांनीं दुःखानें म्हटलें आहे :

> " अगा, मर हा बोल न साहती
> आणि मेलिया तरी रडती "

मरणें हा शब्दहि उच्चारूं देत नाहींत. कोणी मेलें तर जगांत कोठें नसेल अशी आपली रडारड ! असे कांतडीला कुरवाळणारे, सदैव भांडणारे जे करंटे त्यांच्या नशिबीं शतकानुशतकें गुलामगिरी नाहीं येणार तर काय ?

आपण भेदाचीं डबकीं बुजवलीं पाहिजेत. देहाची क्षुद्रता ओळखली पाहिजे. देह हें साध्य नसून एक साधन आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. स्वधर्माचरण करण्यासाठीं हा देह. स्वधर्म म्हणजे स्वतःचें कर्तव्यकर्म. आपणांस जन्मतःच स्वधर्म प्राप्त होत असतो. आईबाप जसे शोधावे लागत नाहींत, तसा स्वधर्म शोधावा लागत नाहीं. आपण कोणत्या तरी एका प्रवाहांत जन्मत असतों. आपल्या सभोंवतीं जी विशिष्ट परिस्थिति असते, त्या परिस्थित्यनुरूप आपणांस स्वधर्म मिळतच असतो. उदाहरणार्थ, आपण परतंत्र हिंदुस्थानांत जन्मलों, म्हणून येथें जन्मणाऱ्या प्रत्येकाचा स्वातंत्र्यासाठीं धडपडणें हा आजचा स्वधर्म आहे.

परंतु स्वातंत्र्यासाठीं धडपडण्याचा स्वधर्म तोहि सर्वांचा सारखाच असेल असें नाहीं. प्रत्येकाची वृत्ति निराळी. कोणी म्हणेल, मी हरिजनसेवा करून स्वातंत्र्याच्या कार्यांत मदत करतों. कोणी म्हणेल, मी खादीचें काम उचलतों. कोणी म्हणेल, मी राष्ट्रभाषेचा प्रचारक होतों. कोणी म्हणेल, मी चर्मालय काढतों. कोणी म्हणेल, मी शास्त्रीय गोरक्षण हातीं घेतों. कोणी म्हणेल, मी साक्षरतेला वाहून घेतों. कोणी म्हणेल, मी मधुसंवर्धनविद्येचा भक्त होतों. कोणी म्हणेल, मी शेतकऱ्यांची संघटना करतों. कोणी म्हणेल, मी कामगारांत घुसतों. कोणी म्हणेल, मी उघड बंड करतों. कोणी म्हणेल, मी फांशीं जातों. कोणी म्हणेल, मी तुरुंगांत बसतों. जो तो आपापल्या शक्तीप्रमाणें, वृत्तीप्रमाणें स्वातंत्र्याच्या कामांत मदत करील.

याला स्वधर्म म्हणतात. स्वधर्म म्हणजे हिंदुधर्म, ख्रिस्तीधर्म असा अर्थ नव्हे. स्वधर्म म्हणजे स्वतःचा वर्णधर्म. वर्ण म्हणजे रंग. कोणता रंग घेऊन आपण जगांत आलों? आपल्या मनोबुद्धीचा कोणता रंग आहे? माझा कल कोठें आहे? तें पाहून तदनुरूप सेवाकर्म हातीं घ्यावयाचें. त्या कर्तव्यकर्मासाठीं मग जगावयाचें, त्यासाठीं मरावयाचें.

"स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः"

या चरणाचा हा असा अर्थ आहे. प्राचीन काळीं पित्याचा जो वर्ण तोच मुलाचा, असें ठरविलें होतें. कारण लहानपणापासून जें घरांत पाहील, आजुबाजूस असेल, तेंच मुलगा उचली; परंतु आपण पुढच्या काळांत आहोंत. निरनिराळ्या शिक्षणपद्धती निघाल्या आहेत. एकाच आईबापांचीं निरनिराळ्या

गुणधर्मांचीं मुलें असतात. त्या सर्वांचा एकच वर्ण नसतो. कोणी चित्रकार होतो. कुणाला फुलाफळांची, शेतीची आवड असते. तेव्हां ज्यानें त्यानें आपल्या वृत्त्यनुरूप स्वधर्म उचलावा. तो स्वधर्म आचरतां आचरतां हा देह झिजवावा. सर्वत्र भरलेल्या आत्मस्वरूपाची जाणीव ठेवून स्वधर्माचरण करण्यासाठीं देहाचें हें साधन लाभलेलें. या देहाच्या साधनानें स्वधर्म आचरीत, सर्वत्र भरलेल्या परमात्म्याची कर्ममय पूजा आपणांस करावयाची आहे.

आत्मा अखंड आहे, देह नाशिवंत आहे, व स्वधर्म अबाध्य आहे, हे तीन सिद्धान्त गीतेनें सांगितले; परंतु केवळ शास्त्र सांगून भागत नसतें. शास्त्र जीवनांत आणण्यासाठीं कला हवी. स्वधर्म आचरा असें सारेच धर्म सांगतात; परंतु गीता सांगते, "स्वधर्म तर आचरच; परंतु फलेच्छा सोडून निष्काम वृत्तीनें तो स्वधर्म आचर!" कृष्ण म्हणतात :

"एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु" तुला सांख्यशास्त्र सांगितलें. आतां योग सांगतों ऐक. आणि योग म्हणजे काय?

"योगः कर्मसु कौशलम्"

कर्म करण्याची कला म्हणजे योग. उत्कृष्ट असें कर्म हातून कधीं होईल? जेव्हां सारखें त्या कर्मांतच रमूं, फळाचें चिंतन करीत न बसतां साधनेंतच तन्मय होऊं, तेव्हां. असें कर्म करण्यांत एक प्रकारचा परम आनंद असतो, कृतार्थता असते. तेथें निराशा शिवत नाहीं.

असें निष्काम कर्माचरण करणारा पुरुष कसा असेल? या देहानें आपल्या स्वधर्माचरणाच्या निष्काम सेवेनें समाजरूपी परमेश्वराची पूजा करणारा तो अनासक्त कर्मयोगी, तो कसा बरें असेल?

जीवनाचें शास्त्र सांगून, निष्काम बुद्धीनें कर्म करण्याची कला सांगून, हें शास्त्र व ही कला ज्याच्या जीवनांत प्रकट होत असते, अशा स्थितप्रज्ञाची मूर्ति भगवंतांनीं दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं उभी केली आहे. गीताशास्त्र दुसऱ्या अध्यायांत जणुं संपलें. पुढचे अध्याय म्हणजे विस्तार आहे. दुसऱ्या अध्यायाला कोणी म्हणूनच एकाध्यायी गीता म्हणतात. दुसऱ्या अध्यायांतीलच हे विचार पुढें अधिक विस्तारानें मांडले आहेत. ते हळूहळू पाहूं चला.

# अध्याय ३ रा

गीता ' स्वधर्माचरण निष्काम बुद्धीनें कर ' असें सांगते. तुमची वृत्ति पहा. स्वतःचे गुणधर्म पहा. तदनुरूप सेवा हातीं घ्या. समाजसेवेचें कोणतेंहि कर्म हीन नाहीं. सारीं कर्में पवित्रच. समाजसेवेचे सारे प्रकार सारखेच मोक्षदायी आहेत. वेद देणारा ऋषि असो वा रस्ता झाडणारा झाडूवाला असो, शाळेंत शिकविणारा शिक्षक असो वा दुकान घालणारा वाणी असो, सारे मोक्षाचे अधिकारी आहेत. कोणी कोणाला हिणवूं नये. माझें कर्म श्रेष्ठ, असें म्हणूं नये. उपनिषदांत एक गोष्ट आहे. एकदां देवांचें भांडण लागलें. वारा म्हणे मी श्रेष्ठ. अग्नि म्हणे मी श्रेष्ठ. पर्जन्यदेव म्हणे मी श्रेष्ठ. इंद्र म्हणे मी श्रेष्ठ. असा त्यांचा वाद चालला असतां तेथें एकदम एक देवता येऊन उभी राहिली. ती ज्ञानदेवता उभा होती. दिव्यरूपानें ती झळकत होती. इंद्र वायूला म्हणाला, " जा, त्या देवतेची विचारपूस करून ये." वायु त्या देवतेजवळ आला व म्हणाला, " आपण कोण ? " देवतेनें विचारलें, " तुम्ही कोण ? " वायु गर्वानें म्हणाला, " मी तुम्हांला माहीत नाहीं ? अहो मी वायु. मी पर्वत उडवतों, झाडें मोडतों, समुद्र नाचवतों. माझी शक्ति अचाट आहे." ती देवता म्हणाली, " ही येथें एक काडी आहे. ती उडवून दाखवा." वायु ती काडी उडवूं लागला. काडी उडवतां येईना. तो खालीं मान घालून निघून गेला. नंतर अग्नि आला. त्यानें देवतेस विचारिलें, " तुम्ही कोण ? " देवतेनें त्याला विचारलें " आपण कोण ! " अग्नि रागानें म्हणाला, " मी तुम्हांला माहीत नाहीं ? मी अग्नि. मी मनांत आणीन तर सर्व ब्रह्मांडाचें भस्म करून टाकीन. माझा प्रभाव अनंत आहे." देवता म्हणाली, " ही येथें एक काडी आहे. ती जाळून दाखवा." अग्नि आदळआपट करूनहि ती काडी जाळूं शकला नाहीं. सारे देव या प्रकारें फजीत झाले. शेवटीं ती ज्ञानरूपिणी म्हणाली, " अरे देवांनो, मी मोठा, मी मोठा, असें करीत भांडत काय बसतां ? सूर्याच्या ठिकाणीं प्रकाशण्याची शक्ति ठेवलेली आहे म्हणून तो मोठा. वायूच्या ठिकाणीं वाहण्याची शक्ति आहे. अग्नीच्या ठिकाणीं जाळण्याची शक्ति आहे ; परंतु त्या त्या स्वतःच्या शक्तीचा गर्व नका करूं. त्या विश्वेश्वरानें ती शक्ति तुमच्या ठायीं ठेवली आहे. तो ती शक्ति काढून घेईल, तर तुम्ही कचरा आहांत."

आपण आपल्या गुणधर्मांप्रमाणें सेवाकर्म करीत जावें. तीं सारीं कर्में मोक्ष देणारीं आहेत; प्रभूला प्रिय आहेत. कर्में करावीं; फलेच्छा सोडून करावीं. परंतु फलेच्छा सोडून जरी कर्में केलीं तर फळ मिळत नाहीं, असें नाहीं. उलट, फलेच्छा मनांत सतत वागवून कर्म करणाऱ्यापेक्षां निष्काम कर्मयोगी अनंतपट फळ मिळवतो. फळाचें चिंतन करीत बसण्यासहि त्याला वेळ नाहीं. तो वेळहि त्या कर्मांतच जात आहे. जो शेतकरी रात्रंदिवस शेतीच्या कामांत रंगला, त्याची शेती इतरांपेक्षां अधिक फलदायी झाल्याशिवाय राहणार नाहीं. निष्काम कर्म करणाऱ्याची जीवनयात्रा नीट चालेल यांत शंका नाहीं; परंतु यापेक्षांहि अत्यंत महत्त्वाचीं अशीं अनेक फळें तो मिळवितो.

गंगेच्या प्रवाहांत एक विज्ञानाचा अभिमान बाळगणारा स्नानार्थ गेला व एक भक्तिभावानें गेला; तर त्या दोघांची अंगशुद्धि होईलच; परंतु भक्तिभावानें स्नान करणाऱ्यास अंगशुद्धीबरोबरच इतरहि फळें मिळतात. विज्ञानवादी म्हणेल, " गंगा म्हणजे काय ? ऑक्सिजन व हायड्रोजन यांचें मिश्रण ! जास्त काय आहे ? " त्याला फक्त अंगशुद्धीचें फळ मिळेल; परंतु तें फळ एकाद्या हेल्यासहि मिळेल. पण भक्तिभावानें जो गेला, गंगा म्हणजे विष्णूच्या पदकमलांपासून जन्मलेली, शंकराच्या जटाजूटांतून बाहेर आलेली, जिच्या तीरावर राजे राज्यें सोडून मोक्षाची साधना करते झाले, जिच्या तीरावर योगी योगाचरणांत रमले, ज्ञानी ज्ञानांत रंगले, भक्त भक्तीनें वेडे झाले अशी ही गंगा, असें मनांत येऊन भावनानीं उचंबळून जो त्या गंगेच्या प्रवाहांत शिरला, त्याला अंगशुद्धीबरोबरच चित्तशुद्धीचेंहि फळ मिळतें. त्याचे शरीराचे मळ धुतले जातात, तसेच मनाचे मळहि धुतले जातात.

निष्काम कर्म करणाऱ्याची जीवनयात्रा चांगली चालते. त्याला चित्तशुद्धीचें फळ मिळतें. चित्तशुद्धीमुळें त्याला त्याच्या कर्मांतूनच ज्ञानहि मिळतें. महाभारतांत तुलाधार वैश्याची गोष्ट आहे. त्याच्याकडे जाजलि नांवाचा एक ब्राह्मण ज्ञानार्थ म्हणून आला. तुलाधार म्हणाला, " माझ्याजवळ कोठलें ज्ञान ? ज्ञान असलेंच तर तें एकच आहे; आणि तेंहि माझ्या तराजूच्या दांडीनें मला शिकविलें आहे. ही तराजूची दांडी जशी सरळ असते, तसें माझें मन सरळ ठेवायला मी शिकलों आहे. शत्रु असो, मित्र असो; स्वजन असोत,

परजन असोत; तराजूची दांडी सरळ, तसें माझें मन." तुलाधाराला त्याच्या वाणिज्याच्या स्वधर्मांतूनच चित्तशुद्धि मिळून मोक्षाचें ज्ञानहि मिळालें. सेना न्हावी, गोरा कुंभार, कबीर सर्वांना त्यांच्या स्वधर्माचरणांतूनच चित्तशुद्धि होऊन ज्ञानहि मिळालें. सेना न्हावी दुसऱ्यांच्या डोयी करी. दुसऱ्यांच्या डोक्यांतील मळ काढी. असा मळ काढतां काढतां त्याच्या मनांत विचार आला, " मी दुसऱ्यांच्या डोक्यांतील मळ काढीत आहें, परंतु माझ्या डोक्यांतील मळ मीं काढला का ? " गोरा कुंभार मडकीं भाजी, कच्चीं आहेत कीं पक्कीं तें पाही. असें करतां करतां त्याच्या मनांत विचार आला, " मडकें कच्चें कीं पक्कें तें मी पाहतों; परंतु माझ्या जीवनाचें मडकें मीं पक्कें केलें आहे का ? " सांवता माळी मळा करी. विषारी रान, निरुपयोगी तण उपटून टाकी. असें करतां करतां त्याच्या मनांत विचार आला, " माझ्या हृदयांतील वासनांचें विषारी गवत मीं उपटून टाकलें आहे का ? " कबीर मोमीन होता. वस्त्रें विणी. विणतां विणतां त्याच्या मनांत येई, " माझ्या जीवनाचें वस्त्र मीं नीट विणलें आहे का ? माझें निर्मळ जीवनवस्त्र प्रभूला देतां येईल का ? "

अशा रीतीनें त्या त्या कर्मांतूनच चित्तशुद्धि होऊन ज्ञानहि मिळतें. कर्मयोगी आपल्या कर्मानें हीं केवढालीं फळें मिळवितो ! फळाची इच्छा मनांत धरून कर्म करणाऱ्यांस तें क्षुद्र फळ मिळेल. परंतु निष्कामवृत्तीनें कर्मांत रंगलेला कर्मयोगी तें फळ मिळवून शिवाय चित्तशुद्धि मिळवितो, ज्ञानाचा अधिकारी होतो; मुक्त जणुं होतो.

स्वधर्माचरण सतत करीत राहिल्यानें समाजांतील दंभहि टळतो. एकादा केवळ निर्वासन झालेला ज्ञानी म्हणेल, " मला आतां कशासाठीं कर्म करावयाचें ? मिळावयाचें असें काय राहिलें ? " परंतु तो जर स्वस्थ बसेल, तर इतरहि तसें करूं पाहतील. याची शांति व समाधान तर त्यांच्याजवळ नाहीं; परंतु केवळ वरपांगीं अनुकरण करतील. समाजांत यामुळें दंभ माजेल. म्हणून कर्मयोगी सतत निष्काम सेवा करीतच राहतो.

असा हा कर्मयोग भगवान् श्रीकृष्ण सांगत आहेत. कर्माचा महिमा त्यांनींच शिकवावा. कोणतेंहि सेवाकर्म तुच्छ नाहीं, हें त्यांनीं स्वतःच्या जीवनांतून दाखविलें. त्यांनीं गायी चारल्या. राजसूययज्ञांत उष्टीं काढलीं, शेण लावलें. जेव्हां शिशुपाल म्हणाला, " त्या कृष्णाची काय अग्रपूजा करतां ? तो गवळट

गायी चारणारा ! " तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, " होय, मी गायी चारणारा कृष्ण. गोपालकृष्ण असें म्हणवून घेण्यांतच मला आनंद आहे." भगवंतांनीं अर्जुनाचे घोडे हांकले. भारतीय युद्धांत सायंकाळ व्हावी; क्षत्रिय सायंसंध्या करावयास जावेत; परंतु भगवान् श्रीकृष्ण त्या वेळेस काय करीत असत? ते रथाच्या घोड्यांस पाण्यावर नेत. त्यांच्या अंगांत रुतलेलीं शल्यें काढीत. त्यांचा खरारा करीत. आपल्या पीतांबराचा तोबरा करून त्यांतून चंदी देत. मोरोपंतांनीं वर्णन केलें आहे :

" औषध सुचणक कल्पी पीतपट पसाहि तोबरा माप
श्रितसाहित्य कराया न बरा मांदार ता बरा मा-प "

हा लक्ष्मीपति भक्तांची किती काळजी घेतो ! कल्पवृक्षापेक्षां हा किती श्रेष्ठ ! हा भगवान् पितांबरांतून चंदी देत आहे !

अशा भगवंतांनीं कर्मांचा महिमा सांगितला आहे. असा हा प्रभु संतांनीं उभा केला आहे. कर्मांचा महिमा सांगून शेवटीं भगवान् सांगतात, " अर्जुना, स्वधर्माचरणानें मोक्ष हातीं येईल. परंतु कामक्रोध, नाना वासना, लोभ यांमुळें स्वधर्माचरण हातून नीट होणार नाहीं. तरी पण कामक्रोध ताब्यांत घे, संयमी हो आणि निष्कामकर्मयोगाच्या साधनानें जीवन कृतार्थ कर."

● ● ●

# अध्याय ४ था

संसार सर्वत्र ओतप्रोत भरलेला आहे. तो सोडूं म्हणतां सोडतां येत नाहीं. प्राणिमात्राच्या पाठीमागें कर्म हें सारखें लागलेलेंच आहे. झोंपणें हें सुद्धां क्रिया—पद आहे. बसणें हें सुद्धां क्रिया—पद. बसून पाय दुखूं लागले म्हणतात. अशा या परिस्थितींत कर्में कशीं टाळणार?

कर्में टाळाल, तर देहयात्रा होणार नाहीं. चित्तशुद्धि लाभणार नाहीं. ज्ञानाचा उदय होणार नाहीं. समाजांत दंभ माजेल. म्हणून सदैव कर्म करीत रहावें. त्याचा कंटाळा करूं नये. स्वतःच्या आवडीचें कर्म हातीं घ्या. स्वतःच्या गुणवृत्तीला अनुरूप असें कोणतेंहि समाजसेवेचें कर्म हातीं घ्या. त्यांत रमून जा.

नुसतें बाह्य कर्म तारक नाहीं. बाह्य कर्माला किंमत कशानें प्राप्त होते?

बाहेरच्या सामान्य कर्मांतून आपण मोक्षाची अमृतधार कशी मिळवावयाची, तें ह्या चौथ्या अध्यायांत सांगितलें आहे.

चौथ्या अध्यायांत तीन शब्द आलेले आहेत : १ कर्म; २ विकर्म; ३ अकर्म.

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।
अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥

कर्म काय, विकर्म काय, अकर्म काय, तें सारें समजून घेतलें पाहिजे. कर्मांचा महिमा अपार आहे. कर्मांची गहनगंभीर गति मोक्षाच्या समुद्रास नेऊन मिळवील; परंतु नीट समजून घेऊं तर.

कर्म म्हणजे बाहेरचें स्थूल कर्म. परंतु विकर्म म्हणजे काय ? विकर्म म्हणजे विशेष कर्म. अधिक महत्त्वाचें काम. विकर्म म्हणजे मनोमय कर्म. समजा, रस्त्यांत एखादा ओळखीचा मनुष्य भेटला. आपण त्याला नमस्कार करतों; परंतु त्या नमस्कारांत जर आपलें मन नसेल, तो जर देखल्या देवा दंडवत असेल, तर त्या नमस्काराचा काय उपयोग ? तो नमस्कार आपणांस बोजा वाटतो. तें नमस्कारानें कर्म आपणांस मुक्त न करतां उलट बद्ध करतें. डोक्या-वर जणुं ओझें देतें.

आपल्या कर्मांत मनाचा सहकार हवा. आपल्या कर्मांत आत्मा ओतलेला असला पाहिजे. म्हणजे तें कर्महि नीट होतें आणि त्या कर्मांचा बोजा वाटत नाहीं. कबीर वस्त्रें विणी तेव्हां,

" झिनी झिनी झिनी
बिनी चदरियाँ "

असें गाणें म्हणत रंगे. बाजारांत कबीर आपलीं तीं सणंगें घेऊन बसला कीं लोक त्या सणंगांकडे बघत रहात. तीं जणुं अमोल वाटत. कारण त्या वस्त्रांत कबिराचा आत्मा होता. कारण त्याचें हृदय तेथें ओतलेलें असे. हृदयाची किंमत कोण करणार ?

" रुक्मिणीनें एका तुळशिदळानें गिरिधर प्रभु तुळिला "

असें बायकांच्या गाण्यांत आहे. सत्यभामेनें सारे अलंकार पारड्यांत घातले तरी कृष्णाची तुला होईना. परंतु भावभक्तीनें भरलेलें एक पान रुक्मिणीनें ठेवलें आणि कृष्णाचें पारडें वर गेलें. सुदामदेवानें कृष्णासाठीं चार मुठी पोहे आणले.

परंतु द्वारकेचा राणा त्या पोह्यांवर जणुं तुटून पडला. सुदाम्याला सोन्याची नगरी देऊनहि त्या पोह्यांची किंमत पुरी करतां आली नसती. ते पोहे साधे नव्हते. ते जणुं मंतरलेले होते. त्या पोह्यांत सुदाम्याचें प्रेमळ हृदय होतें.

वस्तु लहान कीं मोठी हा प्रश्न नाहीं. तिच्यांत तुमचें हृदय आहे कीं नाहीं हा प्रश्न आहे. शेतकऱ्यांची एक म्हण आहे, "ओली पेर, पण खोली पेर." शेतांत जो दाणा पेरावयाचा तो खोल पेरला पाहिजे आणि तेथें ओलहि हवी, तरच अंकुर येईल. त्याप्रमाणें आपलें कर्म मारूनमुटकून केलेलें नसावें. त्यांत हृदयाचा ओलावा असावा. आपण दक्षिणा देतों. ती ओली करून देतों. वर तुळशीपत्र ठेवून देतों. त्यांतील हेतु काय? ती दक्षिणा पै-पैसा असेल; परंतु हृदयाचा ओलावा जर तेथें असेल, तर त्या पैसे कुबेराच्या सर्व संपत्तीहून अधिक मोल आहे. आपल्या नांवानें दगड बसविण्यासाठीं लाखों रुपयांच्या देणग्या देतात, त्या काय चाटायच्या? त्यापेक्षां भक्तिप्रेमानें उचंबळून दिलेली दिडकी अधिक थोर आहे. भीम इतरत्र कितीहि जेवला, तरी कुंतीच्या हातचा एक घांस घेतांच त्याला ढेकर येई. आईच्या हातचा घांस! त्यांत अमृताचे सागर आहेत. आईनें चार ओळींचें पत्र पाठवलें आणि दुसऱ्या कोणीं अर्धा शेर वजनाचा निबंध लिहून पाठवला, तरी आईच्या त्या चार ओळी अधिक वजनदार आहेत. रामायणांत वर्णन आहे, कीं प्रभु रामचंद्रांनीं मृत झालेल्या वानरांकडे, जखमी झालेल्या वानरांकडे प्रेमानें पाहिलें आणि ते सारे अव्यंग होऊन सजीव होऊन उठले. रामरायांनीं किती भावनोत्कट वृत्तीनें पाहिलें असेल! त्यांचा सारा आत्मा त्या दृष्टींत असेल. तुम्ही कितीहि डोळे ताणलेत, रामानें किती अंशांचा कोन करून पाहिलें असेल तें ठरवून पाहिलेंत, तरी त्यानें काय होणार आहे?

कर्मांत विकर्म ओता. बाह्य कर्मांत हृदयाचा सहकार मिसळा म्हणजे तें कर्म प्राणमय होईल. तें जिवंत कर्म होईल आणि पुन्हां त्या कर्माचा तुम्हांला मुळींच बोजा वाटणार नाहीं. आईला मुलाची सेवा करून कधीं कंटाळा येतो का? तुम्ही एकाद्या आईला विचारून पहा, "हे माते, या आजारी मुलाची तूं किती दिवस शुश्रूषा करणार? आतां याला दवाखान्यांत नेऊन आम्हांला शुश्रूषा करूं दे." असें तुम्ही जर म्हणाल तर ती माता म्हणेल, "मी नाहीं हो थकल्यें. मीं काय मोठेंसें केलें? माझा आनंद

नेऊं नका." रात्रंदिवस सेवा करूनहि आईला आनंद वाटतो. कां! कारण तिच्या सेवेंत विकर्म आहे. मनाचा सहकार आहे.

कर्मांत विकर्म मिसळलें म्हणजे त्याचें अ-कर्म होतें. ज्या कर्मांत हृदय ओतलेलें आहे, त्या कर्माचा बोजा वाटत नाहीं. करून न केल्यासारखेंच जणुं वाटतें. जनाबाई सारखें दळीत होती. तिला थकवाच जणुं नाहीं. पांडुरंग जणुं तिला हात लावीत होता. भावभक्तीचा पांडुरंग, आंतरिक जिव्हाळ्याचा पांडुरंग तिच्या जोडीला होता. म्हणून तिला कंटाळा नसे. रात्रंदिवस दळून जणुं ती मुक्त होती.

वि-कर्माची अशी ही महान् शक्ति आहे. बंदुकीची लहान गोळी, परंतु तिला काडी लावा. केवढी तिची शक्ति असते तें दिसेल. तसें विकर्माचें आहे. लहानशा कर्मांत विकर्माची शक्ति ओततांच मोक्षफळ हातीं येतें. एकादा ओबडधोबड मला मोठा ओंडका असावा. तो कोणाच्या डोक्यांत घाला, तर डोकें फुटेल; परंतु त्या ओंडक्याला काडी लावा, त्याचें भस्म होईल. तें घ्यावें व खुशाल अंगाला फांसावें. त्या ओंडक्याचीच का ही राख, असें मनांत येईल. परंतु त्या ओंडक्याचीच ती निरुपद्रवी राख!

ज्या कर्मांत मन नाहीं तें ओझें वाटतें. त्याचा जोजार वाटतो. परंतु कर्मांत मनाचें विकर्म ओतलें कीं मोकळें वाटतें. भगवान् विष्णूचें वर्णन आहे ना :

" शान्ताकारं भुजगशयनम् "

सर्पावर निजलेले असून ते शांताकार आहेत. महात्माजींना एकदां एकानें विचारलें, " तुम्ही प्रचंड चळवळी करतां. किती तुमचे उद्योग! तुमच्यावर किती टीका! परंतु हें सारें करीत असतां तुम्हांला काय वाटतें ? " त्यांनीं उत्तर दिलें, " आंत तंबोरा लागलेलाच असतो." महात्माजींच्या जीवनांतील हें संगीत, हें कोठून आलें? ही शांति कोठून आली? ते जें कांहीं करितात त्यांत त्यांचें विकर्म असतें. त्यामुळें मनाची शांति ढळत नाहीं. प्रसन्नता राहते.

रवींद्रनाथांनीं साधनेंत म्हटलें आहे, " आपण विहिरीवरून एक घागरभर पाणी घरीं आणूं लागलों कीं ती घागर कडेवर बसलीच, डोक्यावर ओझें झालेंच. परंतु जेव्हां आपण पाण्यांत असतों, पुन्हां पुन्हां बुड्या मारीत असतों,

त्या वेळेस हजारों घनफूट पाणी डोक्यावर असतें. तरी तो बोजा आपण सुखानें उचलतों." त्याप्रमाणें जनतेच्या सेवेंत जो बुडाला, त्याला टीकांचे, निंदा-अपमानांचे बोजे वाटत नाहींत. तो तें सारें लीलया सहन करतो.

ही शक्ति कोठून येते, कशानें येते? विकर्मानें येते. जें जें सेवाकर्म उचलाल त्यांत अंतःकरण ओता. आपलें हृदय म्हणजे अमृताची कुपी आहे. हृदयांतील प्रेमाच्या गुलाबदाणींतील पाणी प्रत्येक कर्मावर शिंपडीत जा. तें कर्म सतेज होईल, टवटवीत दिसेल. त्या कर्माचा तुम्हांला बोजा वाटणार नाहीं. शिवाय, अशीं सतेज कर्मे समाजासहि तेजस्वी केल्याशिवाय राहणार नाहींत.

सूर्याला रविवारची सुटी नाहीं. नदीला कधीं सुटी नाहीं. त्यांचें सेवाकर्म रात्रंदिवस चाललेलें आहे. त्याप्रमाणें जो आपल्या सेवेंत अंतरात्मा ओततो, त्याला थकवा वाटणार नाहीं, कंटाळा येणार नाहीं. कर्मांतच त्याचा आनंद, कर्मांतच मोक्ष. कर्म करून जणुं तो अ-कर्मी असतो.

संत सेवाकर्म कधीं सोडीत नाहींत. कारण मोक्ष म्हणून कांहीं निराळी वस्तु आहे असें त्यांना वाटत नाहीं. तुकारामांनीं एके ठिकाणीं गमतीनें म्हटलें आहे :

" कां रे पुंड्या मातलासी
उभें केलें विठोबासी "

" पुंडलिका, माझ्या विठोबाला तूं कां रे युगानुयुगें उभें करून ठेवलेंस ? " पुंडलिक आईबापांचे पाय चेंपीत होता. त्या सेवेनें प्रभु भेटायला आले. पुंडलिकानें एक वीट फेंकली व रहा उभा असें सांगितलें. त्याला माहीत होतें, कीं ज्या माझ्या सेवाकर्मानें पांडुरंग धांवून आला, तो पांडुरंग जोंपर्यंत माझ्या हातांत ही सेवा आहे तोंपर्यंत जाईल कसा ? माझ्या सेवेंतच त्या प्रभूला कायमचें बांधून ठेवण्याचें सामर्थ्य आहे.

म्हणून साधनेंतच रहा. कर्मांतच हृदय ओता. तो मोक्ष समोर येऊन उभा राहील.

आपण आज फार हांवरे झालों आहोंत. जरा कांहीं केलें कीं मिळालें का फळ बघतों. लहान मूल बीं रुजत घालून लगेच अंकुर आला कीं नाहीं पाहतें ; तसें आपलें आहे. जरा तुरुंगांत जातांच मिळालें का स्वराज्य असें आपण पाहतों. परंतु स्वातंत्र्याच्या साधनेंत इतके रमा, कीं तें स्वातंत्र्य एक दिवस

समोर उभें राहील. रामकृष्ण परमहंस म्हणत, " कमळाची कळी चिखलांत पाय रोंवून उन्हांत, वाऱ्यांत तपश्चर्या करीत असते. एक दिवस ती कळी फुलते. भुंगे येऊन कमळाला म्हणतात, " कमळा, फुललास रे तूं ? "

अशा रीतीनें जें कांहीं हातीं घ्याल, त्यांत सर्व जिव्हाळा ओता. त्यामुळें फळ मिळेलच. परंतु तुम्हांला मोकळेपणा वाटेल. त्या कर्माचा बोजा वाटणार नाहीं. तुम्ही मुक्तदशा अनुभवाल.

कर्मांत विकर्म ओतून एक प्रकारची अकर्मी दशा कशी अनुभवावी, तें संतांजवळ जाऊन शिकावें. चौथ्या अध्यायाच्या शेवटीं शेवटीं म्हटलें आहे :

" तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया "

जा, संतांकडे जा. ते कसे वागतात तें पहा. जा, महात्माजींजवळ जरा बस. त्यांची अखंड सेवावृत्ति, त्यांची नम्रता, त्यांचा आनंद, त्यांची शांति, त्यांचें तें मुक्त हास्य, हें सारें त्यांच्याजवळ जा व समजून घे.

अशा थोरांजवळ राहिल्यानें आपल्या अनेक आशंका फिटतात. " गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यस्तु छिन्नसंशयः " असें होतें. म्हणून थोरामोठ्यांकडे मधून मधून जावें. सत्संगति जोडावी. भाराभर ग्रंथ वाचून खरें ज्ञान होणार नाहीं. खरें ज्ञान शेवटीं जीवनांतून येतें. ज्यानें आपल्या जीवनाचा पवित्र दीप पेटवून ठेवला आहे, त्याच्याजवळ जाऊनच आपणांस आपल्या जीवनांत प्रकाश आणतां येईल.

● ● ●

## अध्याय ५ वा

कर्मामध्यें विकर्म ओतलें कीं त्या कर्माचें अकर्म होतें. कर्म करून जणुं संन्यासी. संन्यास म्हणून निराळी वस्तूच जणुं नाहीं. पांचव्या अध्यायांत कर्मयोग व संन्यास यांची तुलना आहे. कर्मयोग श्रेष्ठ कीं संन्यास श्रेष्ठ ? कोणता मार्ग घ्यावा ? भगवान् म्हणतात, " अरे, संन्यास व कर्मयोग हे का वेगवेगळे आहेत ? संन्यास वा कर्मयोग यांत फरक आहे असें म्हणणारे वेडे आहेत." खरोखर हीच गोष्ट आहे. संन्यास व कर्मयोग म्हणजे एकाच नाण्याच्या दोन बाजू.

तरीहि 'कर्मयोगो विशिष्यते' असें म्हटलें आहे. हें कोणत्या अर्थानें म्हटलें आहे? संन्यासापेक्षां कर्मयोगांत विशेष असें काय आहे? विशेष आहे तें हें, कीं कर्मयोग आपण समजूं शकतों. कर्मयोग म्हणजे रात्रंदिवस कर्म करीत असूनहि कांहींहि केलें नाहीं असें वाटणें. ही गोष्ट आपण जीवनांत अनुभवूं शकतों. या गोष्टीची आपणांस कल्पना येऊं शकते. आई मुलाची सेवा करते, परंतु तिला त्या सेवेचें ओझें वाटत नाहीं. आपण मित्रांसाठीं कांहीं श्रम केले तर त्या श्रमांचा बोजा वाटत नाहीं. कर्मयोग समजायला सोपा आहे. कर्म करीत राहून अकर्मी दशेचा अनुभव घेणें हें जरा सोपें आहे. संन्यास म्हणजे कांहींहि न करतां सारें करणें. कर्मयोग म्हणजे सारें करून कांहीं न केल्यासारखें वाटणें. यांतील संन्यास समजणें जरा कठिण. कांहींहि न करतां सारें कसें करावयाचें तें पटकन् समजणार नाहीं. परंतु कर्मयोगाची कल्पना येते, म्हणून तो विशेष आहे. सोपेपणाच्या दृष्टीनें कर्मयोगाचें विशिष्टत्व. एरव्हीं दोन्ही सारखेच.

चौथ्या अध्यायांत म्हटलें आहे कीं,

" इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्
विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् "

प्रभूनें हा योग प्रथम सूर्याला शिकविला आणि सूर्यापासून मनु म्हणजे विचार करणारा पहिला मानव शिकला. सूर्य म्हणजे कर्मयोग व संन्यास यांची मूर्ति आहे. सूर्याला कर्मयोगी म्हणावयाचें कीं संन्यासी म्हणावयाचें? सूर्य उदयाचलावर येऊन नुसता उभा राहतो; परंतु तो पूर्व दिशेला उभा राहतांच साऱ्या जगभर व्यवहार सुरू होतात. पक्षी उडूं लागतात. गुरें चरायला जातात. माणसें उठून नाना प्रकारचे उद्योग करूं लागतात. सारा अंधार नाहींसा होतो. सूर्य येतांच सर्व विश्वाला चालना मिळते.

' मित्रो जनान् यातयति ब्रुवाणो '

असें वेदांत म्हटलें आहे. तो सूर्य मुकेपणानें जणुं हांका मारतो. सर्व लोकांना उद्योग करायला लावतो. असा जो हा सूर्य, त्या सूर्याला आपण जर म्हटलें, " हे सूर्यनारायणा, तुझें केवढें कर्तृत्व! तूं सारा अंधार दूर केलास. सर्व जगांत चैतन्य ओतलेंस. तुला कोटि कोटि प्रणाम!" तर तो सूर्य म्हणेल, " तुम्ही काय म्हणतां तें मला कळत नाहीं. कोणता अंधार मीं दूर केला? मला

चिमूटभर आणून तरी दाखवा. मी कांहीं करीत नाहीं. मी येथें नुसता उभा आहे." सूर्य कांहीं करीत नसून सारें करतो. सारें करून कांहीं करीत नाहीं. संन्यास व कर्मयोग यांची तो संमिश्र मूर्ति आहे. दोन्ही एकच असें जणुं विचारी मानवाला तो सांगत आहे.

आपण असें म्हणत असतों, कीं शुक, याज्ञवल्क्य वगैरे संन्यासमार्गानें गेले. जनकादिक कर्मयोगाच्या मार्गानें गेले; परंतु याज्ञवल्क्याचाच शिष्य जनक व जनकाचा शिष्य शुक. संन्याशाचा कर्मयोगी शिष्य व कर्मयोग्याचा संन्यासी शिष्य. गुरु-शिष्य यांच्यांत अभेद असतो. म्हणजेच संन्यास व कर्मयोग हे अंतर्यामीं एकच आहेत.

तो खरा संन्यास ज्यांत अपरंपार कर्मशक्ति असते. भोंवरा अत्यंत गतिमान् असतो तेव्हां स्थिर वाटतो. शुकाचार्य संन्यासी होते. परंतु परीक्षितीला भागवत सांगूं लागले तर सात दिवस मुळींच थांबले नाहींत. सारखी कर्मधारा जणुं ओतीत राहिले.

समजा, महात्माजी येथें येऊन एकदम उभे राहिले. ते नुसते येतांच सारे एकदम उठतील, स्वच्छता करितील, उद्योग करूं लागतील. महात्माजींचें नुसतें तें अस्तित्व प्रचंड चालना देईल. संन्यास म्हणजे कर्माची अपरंपार प्रेरणा देण्याची शक्ति.

आई मुलावर रागावते. ती अबोला धरते. ती एकहि शब्द बोलत नाहीं. मुलगा हिंपुटी होतो. तो आईजवळ जातो व म्हणतो, "दोन थोबाडींत मार, पण बोल. तुझें हें न बोलणेंच मला फार छळीत आहे. मला दुःख देत आहे. आई, तुझा हा अबोला असह्य आहे." आईच्या त्या न बोलण्यांत किती बोलणें होतें!

चांगदेवांना ज्ञानेश्वरांस पत्र लिहावयाचें होतें; परंतु तीर्थस्वरूप लिहावें कीं चिरंजीव लिहावें तें त्यांना समजेना. ज्ञानदेव वयानें लहान, परंतु ज्ञानानें मोठे! शेवटीं चांगदेवांनीं कोरेंच पत्र पाठविलें आणि तें कोरें पत्र मुक्ताबाईनें वाचलें! "चांग्या, इतकें शिकलास तरी कोरा तो कोराच तूं!" असें ती म्हणाली. ज्ञानदेवांनीं तें कोरें पत्र वाचून उत्तर पाठविलें!

पंढरपूरला कटीवर हात ठेवून पांडुरंग मुकेपणानें उभा आहे; परंतु त्यांतील अर्थ शंकराचार्यांनीं ओळखला. ते पांडुरंगाष्टकांत म्हणतात, "माझ्या भक्तांना

संसारसागर कमरेइतका खोल आहे, असें हा मुका पांडुरंग कमरेवर हात ठेवून सांगत आहे."

संन्यासांत असा अपार अर्थ असतो. त्याचा खरा संन्यास कीं जो उभा राहतांच साऱ्या विश्वाला प्रेरणा मिळते. ज्यानें अपरंपार सेवा जन्मोजन्मीं ओतली असेल त्याच्याच संन्यासांत अशी शक्ति असूं शकेल. बापानें जन्मभर शेतींत काबाडकष्ट केले. आतां तो म्हातारा झाला. त्याचा मुलगा आतां काम करतो. मुलगा दमून घरीं आला कीं बाप त्याच्या पाठीवरून हात फिरवतो व म्हणतो, " बाळ तूं दमतोस. माझ्यानें कांहीं होत नाहीं." मुलगा म्हणतो, " बाबा, तुमच्या या प्रेमळ पाहण्यांत व या हात फिरवण्यांत सारें आहे. तुमची कृपादृष्टि मला अपरंपार शक्ति देते." बापाच्या त्या सुरकुतलेल्या हातांत, त्या संन्यासी हातांत मुलाला कर्मप्रेरणा देण्याची अपार शक्ति असते.

कर्मयोग व संन्यास हे एकरूप आहेत. दगड म्हणजे धोंडा म्हणजे फत्तर. तसें कर्मयोग म्हणजेच संन्यास. असा हा निष्काम कर्मयोग अंगीं बाणवावा. कर्मे करीत राहून मुक्तस्थिति अनुभवावी. ती मुक्तस्थिति एकदम थोडीच येणार आहे? हळूहळू प्रयत्नानें ती स्थिति प्राप्त करून घ्यावयाची आहे.

कर्मामुळें चित्तशुद्धि होत जाते. कर्मामुळें आपलें स्वरूप प्रतीत होतें. समजा, एकादा हिमालयांत जाऊन आला. स्वतःला शांति लाभली असें त्याला वाटतें. त्याला कोणी तरी भक्तिभावानें जेवायला बोलावतो. बावाजी जेवायला येतात. तेथें एकादें लहान मूल दाराच्या कडीशीं खेळत असावें, त्या नादब्रह्मांत तें बालक रंगून गेलेलें असावें. परंतु हिमालयांत शांति मिळवून आलेल्या बावाजीला ती कटकट वाटते! त्या आनंदमूर्ति बालकाच्या अंगावर तो ओरडतो. अशी ही शांति काय कामाची? तुमच्याजवळ क्षमा-शांति किती आहे, त्याची जीवनांत परीक्षा द्या.

आपण रात्रंदिवस कर्मे करीत असतों. कर्मे करतांना अनेकांशीं संबंध येतात. आपण कधीं रागावतों, कधीं भांडतों. कधीं द्वेष-मत्सर मनांत येतात. अशा रीतीनें आपल्या मनांत काय काय घाण आहे ती आपणांस दिसते. आपण ते दोष दूर करण्याची खटपट करूं लागतों. उत्तरोत्तर निर्मळ होत जातों. कपडे उन्हांत वाळत घातले म्हणजे लपलेले ढेकूण जसे बाहेर पडतात, तसे आपल्या

मनांत लपलेले रागद्वेष, कामक्रोध कर्में करीत असतां प्रकट होतात. ते धरावे व त्यांचा निःपात करावा.

तिसऱ्या अध्यायांत भगवंतांनीं कामक्रोधांच्या बाबतींत सावध रहा, असें सांगितलें आहे. पुन्हां पांचव्या अध्यायांतहि तेंच सांगितलें आहे. कामक्रोध जिंकून घेतल्याशिवाय कर्मयोग कसा साधावयाचा? हातून उत्कृष्ट कर्म कसें व्हायचें? विकर्म कसें ओततां येईल? कर्म करून अकर्मी दशा कशी अनुभवितां येईल?

मन निर्मळ, प्रसन्न असेल तरच हातून उत्कृष्ट सेवा होईल. म्हणून सदैव प्रयत्न करावे, धडपडत असावें. धडपड हेंच मानवाचें भाग्य. ज्याची धडपड संपली तो मुक्त तरी किंवा पशु तरी. ज्याच्या जीवनांत धडपड आहे, त्याला आशा आहे. आपल्यासमोर कर्मयोग्याचा दिव्य आदर्श आहे. त्या आदर्शाकडे पावलें टाकीत जावयाचें आहे. देवळाचें शिखर लांबून दिसतें; परंतु पाऊल हातावरच पडतें. त्याप्रमाणें एकदम ध्येयाला मिठी मारतां येणार नाहीं. धडपडत जावें लागेल. कालच्यापेक्षां आज चांगले होऊं, आजच्यापेक्षां उद्यां चांगले होऊं, असें करीत जाऊं. उत्तरोत्तर अधिक चांगलें होतां येत नाहीं म्हणून रडूं. मीराबाईनें म्हटलें आहे:

" **अंसुवन जल सिंच सिंच प्रेम-बेल बोई** "

डोळ्यांतील आंसवें ढाळून प्रेमाची वेल मीं लावली आहे. हे धन्य अश्रू कोणाजवळ आहेत? जर्मन कवि गटे म्हणतो, " जो कधीं रडला नाहीं, त्याला देव मिळणार नाहीं." आपल्यामधील अपूर्णतेची पदोपदीं जाणीव होऊन रडत, धडपडत पूर्णतेकडे जाणारे आपण यात्रेकरू आहोंत. केव्हां तरी तो शेवटचा दिवस येईल, कीं ज्या दिवशीं संपूर्ण विकासाची भेट होईल. तुकाराममहाराज म्हणतात:

" **याजसाठीं केला होता अट्टाहास**<br>**शेवटचा दीस गोड व्हावा** "

दगड फोडणारा घाव घालीत असतो. शेवटच्या घावाला छकलें होतात; परंतु पहिले घाव का निरुपयोगी होते? महात्माजींनीं लिहिलें होतें, " प्रयत्न म्हणजेच यशःसिद्धि." प्रत्येक प्रयत्न, प्रत्येक पाऊल आपणांस उत्तरोत्तर पुढें नेतें.

आणि एक दिवस संपूर्ण ज्ञान होईल. सारे खळमळ धुऊन जातील; परंतु

संपूर्ण ज्ञान या देहांत मावूं शकणार नाहीं. देह फाटेल, देह गळून पडेल. जीवन्मुक्त या देहांत मिळणें कठिण. जनकादिकांना आपण जीवन्मुक्त म्हणतों. त्याचा अर्थ इतकाच, कीं ध्येयाच्या जास्तींत जास्त जवळ ते गेले होते. जसें भूमितींत आपण म्हणतों कीं, "ही सु-रेषा समजा." भूमितींत पदोपदीं "समजा" हा शब्द असतो. कारण रेषा काढावयाची कशी? रेषेची व्याख्या काय? जिला लांबी आहे, परंतु रुंदी नाहीं ती रेषा. रुंदीशिवाय लांबी कशी काढायची? बर्फीची लांबी खा, रुंदी खाऊं नको असें म्हटलें, तर बर्फी खातां येईल का? आपण तरीहि रेषा काढतों. कमींत कमी रुंदीची लांबी काढतों; परंतु निर्दोष रेषा काढतां येणार नाहीं. तसा संपूर्ण कर्मयोग, संपूर्ण संन्यास या देहांत मावूं शकणार नाहीं. किती झालें तरी हा मातीचा गोळा आत्म्याला चिकटलेला आहे. थोडी तरी अपूर्णता राहतेच. ती देहपातानंतर संपते. तुकाराम म्हणतात :

> " उद्योगाची धांव बैसली आसनीं
> पडलें नारायणीं मोटळें हें "

सारे उद्योग जसे गळून पडतात; सर्वत्र स्वतःचें परम स्वरूप दिसतें आणि देहाचें हें मोटळें प्रभुचरणीं पडतें. जीवन कृतार्थ होतें.



# अध्याय ६ वा

जीवनांत कर्मयोग कसा आणावा, कोणते उपाय करावेत, तें या सहाव्या अध्यायांत सांगितलें आहे. जीवन यशस्वी करावयास संयमाची अत्यन्त आवश्यकता आहे. मनुष्य व पशु यांच्यात जर कोणता फरक असेल, तर मनुष्य आपल्या वासना-विकारांवर अंकुश चालवूं शकतो हा होय. संयमहीन मनुष्य म्हणजे वृकव्याघ्रच जणुं असतो. संयमाशिवाय जीवनाला किंमत नाहीं. कार्लाइल हा प्रसिद्ध पाश्चिमात्य तत्त्वज्ञानी म्हणतो, "त्या घोड्याला लोक किंमत देतात, जो घोडा स्वतःला लगाम घालून घेतो, पाठीवर जीन कसूं देतो; परंतु जो घोडा लगाम घालूं देणार नाहीं त्याला कोण जवळ करणार? घोड्याला चामड्याचा लगाम असतो, माणसाला कोणता लगाम घालायचा? माणसानें स्वतःच विवेकाचा लगाम घालून घ्यावा, तरच त्याची किंमत वाढेल."

जें समाजसेवेचें कर्म आपण हातीं घेऊं तें नीट व्हावें असें खरोखर वाटत असेल, तर आपण आपल्या सर्व इंद्रियांवर ताबा ठेवला पाहिजे. भगवान् शंकर म्हणजे योग्यांचे मुकुटमणि. परंतु ते योगियांचे राणे कसे झाले? त्यांनीं ज्ञानाचा डोळा पेटवून ठेवला आहे. सर्व इंद्रियांवर त्या ज्ञानचक्षूची दृष्टि आहे. वेडीं-वांकडीं जातील तर त्यांचें भस्म होईल. आपण हा विवेकवैराग्याचा तृतीय नेत्र उघडा ठेवला पाहिजे.

तुमच्या ज्या नैसर्गिक क्षुधा आहेत त्या अजीबात मारा, असें धर्माचें सांगणें नाहीं; परंतु त्यांना मर्यादा घाला असें धर्म सांगतो. झोंपूं नका असें धर्म सांगत नाहीं; परंतु लौकर झोंपा, लौकर उठा असें तो सांगतो. खाऊं नका असें नाहीं धर्म सांगत. बेतानें व शरीराला हितावह तेंच खा असें धर्म सांगतो. तुकाराम-महाराज म्हणतात :

" विधीनें सेवन धर्माचें पाळन "

विषयांचें संयमपूर्वक सेवन करा. असें केल्यानें धर्मपालन केल्यासारखें आहे. सर्वत्र मर्यादा पाळा. प्रभु रामचंद्राना मर्यादा-पुरुषोत्तम असें म्हणतात. ज्याला पुरुषोत्तम व्हावयाचें आहे, नराचें नारायण व्हावयाचें आहे, त्यानें मर्यादा घालून घेतली पाहिजे.

ज्ञानेश्वरींत या अध्यायांत फार गोड ओव्या आहेत. ज्ञानेश्वर म्हणतात, "अरे, योग योग म्हणजे काय? योग म्हणजे मोजकें बोलणें, मोजकें चालणें; मोजकी झोंप, मोजका आहार; इंद्रियांना असें प्रमाणांत दे, म्हणजे त्यांनाहि समाधान मिळून जीवनांत सुखशांति वाढतील."

आपण एकादी वस्तु आवडली व तीच खात बसलों तर आजारी पडूं. एकादे वेळेस जागतच बसलों तर प्रकृति नीट राहणार नाहीं. आपल्या स्वधर्मांत अडथळा येऊं नये म्हणून शरीर नीट हवें. शरीर नीट राहिलें म्हणजे मनहि प्रसन्न राहील. कार्लाइल हा पाश्चिमात्य पंडित म्हणतो, "आपलें निम्में तत्त्वज्ञान पोटाच्या स्थितीवर अवलंबून असतें." ज्याला सारखीच बद्ध-कोष्ठता, ज्याचें डोकें सारखें दुखत आहे, त्याच्या हातून स्वधर्म कसा पार पडणार? मॅझिनी हा थोर इटॅलियन देशभक्त एकदां म्हणाला, "माझ्या देशाला माझी जरुरी असतां मी आजारी कसा पडूं शकेन?" हा देह सेवेसाठीं आहे. तो निरोगी राखला पाहिजे. महात्माजी पांच पदार्थांपेक्षां जास्त खात

नाहींत. ज्यानें रसनेवर संयम मिळविला, त्याला शारीरिक व मानसिक स्वास्थ्य मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

संयमानें जीवनांत आनंद येतो, संगीत येतें. रवींद्रनाथ म्हणतात, "संयमानें विकास होतो. झाडाला मुळांनीं जमिनीशीं बांधून ठेवलें आहे, म्हणूनच झाड उंच जातें, फुलांफळांनीं शोभतें. झाड जर म्हणेल, कीं हीं मुळांचीं बंधनें कशाला? मला वर उडूं दे; तर तें झाड तरारेल का, भरारेल का? तें सुकेल. तें बांधलेलें आहे म्हणूनच वाढतें. नदीला दोहों बाजूंनीं तीरांचें बंधन आहे म्हणूनच तिला गति आहे, खोली आहे. सतारीला तारा बांधलेल्या आहेत म्हणूनच त्या तारा दिव्य संगीत देतात." असा हा संयमाचा महिमा आहे. संयमाशिवाय सुसंस्कृतता नाहीं, विकास नाहीं.

न्यायमूर्ति रानड्यांना आंबा फार आवडे. एकदां कोणी तरी कलमी आंब्यांची भेट पाठविली. रमाबाईनीं सुरेख फांकी करून बशींत भरून त्यांच्यापुढें नेऊन ठेवल्या. न्यायमूर्ति महत्त्वाच्या कामांत होते. तरीहि त्यांनीं एकदोन फांकी घेतल्या. रमाबाईना वाईट वाटलें. आपण एवढा आंबा कापून नेला; परंतु न्यायमूर्तींनीं दोनच फोडी खाल्ल्या, हें पाहून त्या खट्टू झाल्या. पुढें न्यायमूर्तींनीं काम संपल्यावर हंसत विचारलें, "चेहरा कां उतरला? काय झालें?" रमाबाई म्हणाल्या, "मेलं माणसानें मनापासून कांहीं आणून द्यावें, परंतु तें घेऊंहि नये का?" न्यायमूर्ति म्हणाले, "अग, आंबा आवडतो आवडतो म्हणून का मरेपर्यंत आंबेच खात बसूं? तूं आणलास कापून म्हणून खाल्ल्या दोन फोडी. खाण्यापिण्याच्या आनंदापेक्षां उच्चतर दुसरे आनंद आहेत; तिकडे मनाला वळवलें पाहिजे."

आपण पुष्कळसा वेळ या क्षुद्र गोष्टींच्या चर्चेत दवडतों. आपली शक्ति त्यांत दवडतों. आज काय काय खाल्लें, तें कसें होतें, याचीच चर्चा करतों. मिटक्या मारतों. खरें पाहिलें तर गोडी वस्तूंत नसून स्वतःमध्येंच आहे. जें येईल तें गोड करून घेतां येईल. आईच्या हातचा कोंड्याचा मांडाहि गोड वाटतो. कारण आपल्या अंतरात्म्याची माधुरी आपण त्यांत ओततों. उपनिषदें म्हणतात, "हा आत्मा म्हणजेच रसानां रसतमः" आत्मा म्हणजेच माधुर्य-सागर. आईला स्वतःचें मूल गोड वाटतें. कारण ती स्वतःच्या आत्म्याची माधुरी त्या मुलांत ओतते. त्या वैदिक मंत्रांत म्हटलें आहे ना:

" अंतर्हृदा मनसा पूयमानः
घृतस्य धारा अभिचाकशीमि "

आपलें भरलेलें हृदय, भरलेलें मन, म्हणजेच घृताची धारा. आईनें साधा भात वाढला तरी त्यांत सारीं दुधें-तुपें येऊन जातात.

आपलें जीवन हेतुमय आहे. तें व्यर्थ दवडण्यासाठीं नाहीं. पुरुषार्थप्राप्ति करून घ्यावयाची आहे.

" मानवदेहाचे या साधनें
सच्चिदानंद पदवी घेणें "

या देहाच्या साधनानें परमेश्वर मिळवून घ्यावयाचा आहे. वायफळ गोष्टींत वेळ दवडूं नका, शक्ति खर्चूं नका. आहारविहारांत सर्वत्र प्रमाण राखूं या. सौन्दर्य हें प्रमाणांत आहे. जीवन सुंदर करावयाचें असेल, तर सर्वत्र प्रमाण राखा.

कर्तव्याचरणांत खंड पडूं नये म्हणून शरीर सतेज, निरोगी हवें. मन प्रसन्न हवें. मन प्रसन्न राखण्यासाठीं मधूनमधून सृष्टिसौंदर्य पहावें. त्या जगन्माउलीनें तुम्हांआम्हांस रिझविण्यासाठीं सृष्टींत अपरंपार सौंदर्य ओतून ठेवलें आहे. ती अमृतत्वाची जणुं ध्वजाच अशी उषा पहा. सुंदर सूर्योदय पहा. सायंकाळची आकाशांतील रंगशोभा पहा. रात्रीचा चंद्रमा पहा. अनंत तारे पहा.

" पश्य देवस्य काव्यं न ममार न जीर्यति "

प्रभूचें हें अमर काव्य खालीं, वर, सर्वत्र पसरलेलें आहे तें पहा. कधीं उत्तुंग पर्वतावर जावें; कधीं पवित्र नद्या पहाव्या; कधीं प्रशांत वनांत बसावें; कधीं उचंबळणारा अपरंपार सागर पहावा. सृष्टीच्या दर्शनानें मनाचा शीण जातो. स्वामी रामतीर्थ म्हणत असत, " कधीं उदास वाटलें, तर मी एकदम बाहेर पडत असें. तो वाहणारा वारा अंगाला लागतांच जणुं नवजीवन आल्यासारखें वाटे." सृष्टीचा स्पर्श जीवनदायी असतो. मनस्ताप हरतो. जगांतील निंदा, अपमान, अपयश इत्यादींमुळें मनाला आलेली ग्लानि सृष्टिसौन्दर्यानें नाहींशी होते. म्हणून भगवान् सांगून राहिले आहेत, कीं जरा नदीकाठीं बस. पक्ष्यांची मधुर किलबिल चालली आहे, मोराचा पिसारा दिसतो आहे, हरणें उड्या मारीत आहेत अशा जागीं जरा बस. मनाला आराम मिळेल. पुन्हां उत्साहानें कर्तव्य करावयास सिद्ध होशील.

सृष्टीचें दर्शन घ्यावें, आहारांत परिमितता ठेवावी, थोडेंफार खेळावें. खेळ ही पवित्र वस्तु आहे. भगवान् कृष्ण गोकुळांत खेळ खेळत असत. त्यांचा तो सवंगडी पेंद्या, तो का कोणी विसरेल? यमुनेच्या तीरीं गोपाळबाळांबरोबर कृष्ण परोपरीचे खेळ खेळे. टिपऱ्या खेळे. हमामा, हुतुतू, लगोऱ्या, सारे खेळ खेळे. भगिनी निवेदिता यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे, "श्रीकृष्णांनीं खेळांनाहि दिव्यता दिली आहे."

अशा प्रकारें आहार, विहार, इत्यादि क्रिया परिमित प्रमाणांत कराव्यात. निसर्गाचें, आकाशाचें दर्शन घेत जावें. संयम राखावा. शरीर, मन, बुद्धि सतेज व निकोप राहतील असें करावें. म्हणजे आपणांस स्वधर्मकर्म सदैव नीट आचारतां येईल.

"मन करा रे प्रसन्न
सर्व सिद्धीचें कारण"

असें तुकारामांनीं म्हटलें आहे. शरीर प्रसन्न असलें म्हणजे मनहि प्रसन्न राहील. तुमच्या अंतर्बाह्य प्रसन्नतेनें इतरांसहि समाधान लाभेल. त्यांनाहि उत्साह व आशा येईल. अशा रीतीनें जीवनांत निर्दोष कर्मयोग आणण्यासाठीं पराकाष्ठा करावी. कृपाळू भगवंतांनीं बारीकसारीक सूचना जणुं येथें दिल्या आहेत. त्या सदैव ध्यानीं धराव्या व जीवन सफळ होईल असें करावें.

● ● ●

## अध्याय ७ वा

सहाव्या अध्यायाच्या अखेरीपर्यंत आपण कर्माचा महिमा पाहिला. कर्म हातून नीट व्हावें म्हणून सहाव्या अध्यायांत भगवंतांनीं साधनाहि सांगितली. आतां सातव्या अध्यायापासून एक निराळेंच दालन उघडण्यांत आलें आहे. सातव्या अध्यायापासून बाराव्या अध्यायापर्यंत भक्तीचा ऊहापोह आहे. भक्ति म्हणजे साधनांचा राजा. इतर साधनें म्हणजे साबण, रिठे, सोडा यांप्रमाणें आहेत. परंतु भक्ति म्हणजे निर्मळ जळ. साबण, रिठे, सोडा हीं भरपूर असून पाणी नसेल तर कपडे स्वच्छ कसे करावयाचे? परंतु साबण, रिठे वगैरे नसले, तरी पाण्यानें बरेंच धुतां येईल. चित्ताचे सूक्ष्म मळ शेवटीं भक्तीनेंच धुतले जातात.

या सृष्टींत एकाच तत्त्वाचा सारा पसारा आहे. जसा एकादा कुशल चित्रकार एकाच ब्रशानें व एकाच रंगानें नानाविध पशुपक्षी रंगवितो, मानव रंगवितो, निसर्गांतील दृश्यें रंगवितो, तसेंच तो विश्वंभर करीत असतो. सर्वत्र एकच मसाला. बाह्य रूपरंग निराळे; परंतु आंत एकच तत्त्व. सर्व ब्रह्मांडांतील बाह्य विविधतेच्या आंत असलेला तो परमात्मा पाहणें, त्याची कळा ओळखणें ही मुख्य गोष्ट आहे. ही दृष्टि ज्याला आली त्याला सारें कांहीं मिळालें. ही दृष्टि ज्याच्याजवळ नाहीं त्याला इतर कांहीं मिळालें तरी व्यर्थ होय.

त्या परमात्म्याला सर्वत्र पाहणें म्हणजे खरी भक्ति. परमेश्वराकडे आपण निरनिराळ्या मार्गांनीं जात असतों. भक्तीचे निरनिराळे प्रकार असतात. या अध्यायांत भक्तीचे चार प्रकार सांगितले आहेत.

आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी असे हे चार प्रकार आहेत. या चारी भक्तांना " उदार " हें विशेषण लावलेलें आहे. " उदाराः सर्व एवैते " अर्जुना, हे सारे भक्त उदार असतात. उदारतेशिवाय भक्ति संभवत नाहीं. किंबहुना, असेंहि म्हटलें तरी चालेल, कीं उदारता म्हणजेच भक्ति.

आपल्यासारखेच दुसरे आहेत ही जी एक भावना, तिच्या पोटीं भक्तीचा जन्म आहे. आर्त म्हणजे दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होणारा. केवळ स्वतःच्या दुःखानें विव्हळ होऊन परमेश्वरास हांका मारणारा तो आर्त भक्त नव्हे. अर्थात् स्वतःचें सुखदुःखहि देवाजवळ सांगणारा तो कांहीं कमी प्रतीचा असें नाहीं. ती गोष्ट सुद्धां या जगांत दुर्मिळ आहे. सतरा जणांसमोर तोंड वेंगाडण्यापेक्षां त्या जगच्चालकाचीच करुणा भाकणें ही गोष्टहि असामान्य आहे. एकदां एक फकीर अकबर बादशहाकडे कांहीं मागण्यासाठीं म्हणून आला. त्या वेळेस बादशहा मशिदींत प्रार्थना करीत होता. देवळाजवळ अधिक धनदौलत, अधिक राज्य मागत होता. बादशहाची ती प्रार्थना ऐकून फकीर मुकाट्यानें परत चालला; परंतु प्रार्थनेनंतर बादशहास नोकर म्हणाला कीं फकीर आला होता, परंतु तो तसाच माघारा गेला. अकबरानें त्या फकिरास बोलावून आणलें. त्यानें त्याला विचारलें, " माझ्याकडे येऊन असा विमुख कां जातोस? काय हवें तें माग." तो फकीर म्हणाला, " राजा, तुझ्याजवळ मागण्यांत काय अर्थ? तूंहि माझ्यासारखा एक भिकारीच आहेस! ज्या परमेश्वराजवळ तूं मागत होतास, त्याच्याचजवळ मलाहि मागूं दे."

तुकारामांनीं म्हटलें आहे :

जाऊं देवाचिया गांवा । देव देईल विसांवा
देवा सांगूं सुखदुःख । देव निवारील भूक ॥

अशा रीतीनें देवाजवळ आपलें सुखदुःख सांगणारे, त्याची करुणा भाकणारे तेहि एक प्रकारें आर्तभक्तच; परंतु गीतेंतील आर्तभक्त तो हा नव्हे. गीतेंतील आर्तभक्त उदार आहे. तो स्वतःच्या दुःखानें दुःखी नसून, दुसऱ्यांचें दुःख पाहून दुःखी झालेला आहे. समर्थ रामदासस्वामी लहानपणीं घरांत कोठें तरी लपले होते. आठ-दहा वर्षांचें वय; परंतु आजुबाजूचें अपरंपार दुःख व दैन्य पाहून त्यांचें हृदय जणुं पिळवटून गेलें. बाळ कोठें गेला म्हणून आई धुंडीत होती. शेवटीं खोलींत एका कोपऱ्यांत बाळ आढळला. आई म्हणाली, "वेड्या, येथें अंधारांत काय करतोस?" तो उदार मनाचा बाळ म्हणाला, "आई, चिंता करितों विश्वाची." समर्थ बालवयांतच विश्वाची चिंता करूं लागले. सर्वांना सुखी कसें करतां येईल याची विवंचना करूं लागले. ती आर्तभक्ति होती. विवेकानंदांची अशीच एक गोष्ट आहे. एके दिवशीं रात्रीं त्यांना झोंप येईना. डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वहात होत्या. उशी ओलीचिंब झाली. त्यांच्या मित्रानें विचारलें, "काय झालें? कां रडतां?" ते म्हणाले, "काय सांगूं? या माझ्या देशाची स्थिति कशी सुधारूं ही चिंता मला रडवीत आहे. तुम्हीं माणसाचे पशू केले आहेत. अस्पृश्यांची किती केविलवाणी दशा! स्त्रियांची किती दुर्दशा! सर्वत्र विषमता, अज्ञान! जिकडे तिकडे गुलामगिरी! स्वकीयांची व परकीयांची! सारें आकाश जणुं फाटलें आहे असें वाटतें; परंतु मला जर एक हजार सेवक मिळतील, सिंहाच्या छातीचे, निश्चयी वृत्तीचे वीर मिळतील, तर या हिंदुस्थानचें स्वरूप मी बदलून टाकीन." अशी विवेकानंदांची आर्तभक्ति होती. दुसऱ्याचें दुःख पाहून सारखी तळमळ वाटणें म्हणजे आर्तभक्ति. विवेकानंदांनीं देशभक्तीची व्याख्या करितांना एके ठिकाणीं म्हटलें आहे, "तुम्ही तुमच्या देशबंधूंच्या सुखदुःखांशीं एकरूप झालां आहांत का? त्यांच्या नाडीच्या ठोक्यांबरोबर तुमच्या नाडीचे ठोके पडतात का? त्यांच्या हृदयांबरोबर तुमचें हृदय उडतें का? बोला. असें असेल तर देशभक्तीची पहिली पायरी तुम्ही चढलेत, असें मी म्हणेन."

अशा आर्तभक्तींतूनच जिज्ञासु-भक्ति उत्पन्न होते असें म्हटलें तरी चालेल. जगांत दुःख आहे, अन्याय आहे, विषमता आहे, रोग आहेत. हें अपरंपार दुःख कसें दूर करूं असें मनांत येऊन मनुष्य विचार करूं लागतो. तो प्रश्न करूं लागतो. रोग पाहून हे रोग कां होतात याची चर्चा तो करूं लागतो. तो संशोधक होतो. जगांतील नाना प्रकारचें जें दुःख, तें दूर करण्यासाठीं प्रयोग करूं लागतो.

हे जिज्ञासू-भक्त आपल्याकडे फार झाले नाहींत. पाश्चिमात्यांत असे भक्त फार झाले. एक इटॅलियन शास्त्रज्ञ प्लेगाचें संशोधन करूं लागला. संशोधन करतां करतां त्याला प्लेगची गांठ आली. केलेलें संशोधन त्या तापांत तो लिहून ठेवीत होता. एक जर्मन शास्त्रज्ञ प्रयोगालयांत प्रयोग करीत होता. एकदम स्फोट झाला. त्याचा एक डोळा फुटला, एक हात तुटला. दुसऱ्या हातानें परमेश्वरास प्रणाम करून तो म्हणाला, "देवा, अजून एक डोळा शाबूत आहे. एक हात सुरक्षित आहे. तुझें रूप मी शोधून काढीन." असे जिज्ञासू भक्त पाश्चिमात्य संस्कृतीच्या पायांत आहेत. कोणी ध्रुवावर जातात, तेथें संशोधन करतात. कोणी हिमालयावर पुन्हां पुन्हां चढायला येतात. मानवी सुखांत कशी भर घालतां येईल याचे कोणी प्रयोग चालवितात. हे सारे जिज्ञासू भक्त होत.

जगांतील दुःख कोणत्या मार्गानें दूर होईल या विचारांतून जिज्ञासा उत्पन्न होते. जिज्ञासा आपणांस अनेक मार्ग दाखविते. या मार्गानें दुःख दूर होईल का, या मार्गानें होईल का? असा आपण विचार करीत जातों. जे अनेक मार्ग दिसतात, त्यांतील हितकर मार्ग कोणता? खरा कल्याणप्रद मार्ग कोणता? दिसलेल्या अनेक मार्गांतील खरा मार्ग कोणता, याचा विचार करणारा तो अर्थार्थी भक्त. अर्थार्थी भक्त म्हणजे पैसे मागणारा भक्त नव्हे. अर्थार्थी म्हणजे कशांत अर्थ आहे तें पाहणारा. आज जगांत अनेक वाद आहेत. गांधीवाद आहे, समाजवाद आहे, साम्राज्यवाद आहे, भांडवलशाही आहे, फॅसिझम् आहे. सर्वांच्या कल्याणाचा मार्ग कोणता? कोणत्या मार्गानें गेलें तर सर्वांचे संसार सुखाचे होतील? सर्वांच्या जीवनाचा नीट विकास होईल? सर्वांना विश्रांति मिळेल, ज्ञान मिळेल, कलानंद चाखतां येईल? असा विचार मनांत येऊन आपण मार्गसंशोधन करतों. कोणता तरी एक मार्ग आपण पत्करतों.

या मार्गानें जाऊं तर सर्वांचें कल्याण होईल असें वाटतें. मग त्या मार्गाला आपण वरतों. तें जें निश्चित ज्ञान होतें, त्या ज्ञानाला आपण वरतों; म्हणजेच ज्ञानी भक्त आपण होतों. ज्ञानी म्हणजे जें ज्ञान झालें, तें पदोपदीं जीवनांत आणूं पाहणारा. बुद्धांना जें ज्ञान झालें, जगाच्या कल्याणाचा म्हणून जो रस्ता त्यांना वाटला, त्याचा मरेपर्यंत ते उपदेश करीत राहिले. पुन्हां पुन्हां जन्म घेईन व हें ज्ञान जगाला देत राहीन असें ते म्हणाले. महात्माजींना गरिबांचें दुःख कसें परिहरूं अशी चिंता होती. त्या चिंतेचें चिंतन करीत असतां त्यांना अनेक मार्ग दिसले. परंतु शेवटीं चरखा हाच त्यांना तारक परमेश्वर वाटला. त्या चरख्याला त्यांनीं हृदयाशीं धरलें. माझ्या ईश्वराचें नांव चरखा असें ते म्हणाले. रात्रंदिवस चरख्याचें ध्यान त्यांना लागलें. जें ज्ञान झालें, जो विचार सुचला, सर्वांच्या कल्याणाचा म्हणून जो मार्ग निश्चितपणें वाटला, त्या दिशेनें जीवन सारखें नेणें म्हणजे ज्ञानी भक्त होणें होय. रात्रं-दिवस मग त्या गोष्टीचा ध्यास, त्या गोष्टीचा जप, त्या गोष्टीचा प्रचार, त्या गोष्टीचा जयजकार. हा जन्म त्या ध्येयासाठीं; पुढचा जन्म आला तरी तदर्थच. अशा रीतीनें ध्येयाशीं, मिळालेल्या ज्ञानाशीं लग्न लागलेला तो ज्ञानी भक्त होय.

भगवान् म्हणतात, "अर्जुना, हा ज्ञानी भक्त मला फार आवडतो." ज्ञानेश्वरींत एके ठिकाणीं प्रभु म्हणतो, "अर्जुना, माझ्या भक्ताला नीट मिठी मारतां यावी म्हणून मीं चार हात धारण केले. त्या माझ्या भक्ताला बघावें म्हणून निर्गुण, निराकार असूनहि मी दोन डोळयांचा सगुण, साकार बनलों. त्या भक्ताची पूजा करण्याठीं मीं हातांत कमळपुष्प घेतलें आहे."

> " दोंवरी दोनी । भुजा आलों घेवोनी
> आलिंगावया लागोनी । तयाचा देह ॥
> तया पहावयाचे डोहाळे । म्हणून अचक्षूसीं मज डोळे
> हातींचेनि लीलाकमळें । तयासीं पूजूं ॥ "

किती गोड ओंव्या! जगाच्या मंगलासाठीं अशी डोळस व निर्मळ भक्ति बरोबर घेऊन सदैव झुंजणारा जो महात्मा, तो धन्य होय!



# अध्याय ८ वा

आपणांस जें वाटलें, जो पवित्र विचार स्फुरला, जें निःशंक असें ज्ञान वाटलें, त्याच्या प्रकाशांत सतत पांवलें टाकीत जाणें हा आपला परम धर्म होय. असें करीत असतां हा देह एक दिवस गळून पडेल. ज्या वेळेस मरणाचा क्षण येईल, त्या वेळेस जीवनाचा परम विकास झालेला असूं दे. कसें मरावें हें या आठव्या अध्यायांत सांगितलें आहे.

एकदां एकनाथांना एक मनुष्य म्हणाला, "नाथ, तुमचें जीवन किती सुंदर, किती प्रशांत! आमच्या जीवनांत सदैव ओढाताण! सदैव गोंधळ, कामक्रोध, द्वेषमत्सर यांचा सारखा गदारोळ! आम्ही तुमच्यासारखें जीवन कसें जगूं? कोणती युक्ति? कोणता उपाय?" नाथ म्हणाले, "तें सारें राहूं दे; परंतु तुला एक गोष्ट सांगतों. तुझें मरण जवळ आलें आहे. आठा दिशीं तूं मरणार असें वाटतें." तो मनुष्य घाबरला. तसाच घरीं आला. त्याला सारखें मरण दिसूं लागलें. आठा दिशीं मरणार. अरेरे! आतां आठच दिवस! असें तो म्हणूं लागला. तो शेजाऱ्यांकडे गेला व म्हणाला, "मित्रांनो, मी भांडलों, त्याची क्षमा करा. आठ दिवसांनीं मी मरणार!" तो पत्नीला म्हणाला, "मीं तुला उगीच छळलें. नाहीं नाहीं तें बोललों. तुझें हृदय शतदां दुखविलें. मला क्षमा कर. मी आतां मरणार." त्यानें आपल्या मुलांना पोटाशीं धरलें. तो त्यांना म्हणाला, "तुम्हांला मीं उगीच मारलें, झोडपलें. बाळांनो, मी आतां जाणार. तुम्हांला प्रेमानें जवळ घेऊं दे!" गांवांत ज्यांच्या ज्यांच्याजवळ तो भांडला होता, ज्यांच्या ज्यांच्याजवळ द्वेष-मत्सरानें झगडला होता, त्या सर्वांजवळ जाऊन त्यानें क्षमा मागितली. "झालें गेलें विसरा, मी मरणार आठा दिशीं!" असें म्हणून सर्वांना तो हात जोडी.

आठ दिवस झाले. नाथ त्या मनुष्याच्या घरीं आले. तो मनुष्य नाथांच्या पायां पडून म्हणाला, "आली का वेळ?" नाथ म्हणाले, "तें देवाला माहीत. परंतु तुझे हे आठ दिवस कसे गेले? कितीकांशीं भांडलास? किती जणांचा अपमान केलास?" तो म्हणाला, "नाथ, कोठलें भांडण नि काय! सारखें मरण डोळ्यांसमोर दिसत होतें. सर्वांची क्षमा मागत होतों. झालें-गेलें

विसरून जा असें म्हणत होतों. मांडायला वेळच नाहीं!" नाथ म्हणाले, "गड्या, आठ दिवस जी गोष्ट डोळयांसमोर ठेवून तूं वागलास, ती गोष्ट सदैव डोळयांसमोर ठेवून आम्ही वागत असतों. एक दिवस हा देह जायचा आहे. तेव्हां देहाचे गुलाम न होतां देवाचे गुलाम व्हावें. गोड बोलावें. सर्वांवर प्रेम करावें. जें जवळ असेल तें सर्वांस द्यावें. आपल्या या क्षणभंगुर जीवनानें दुसऱ्यांच्या जीवनांत जर मंगल आनंद निर्माण करतां आला, तर केवढी बहारीची ती गोष्ट होईल!"

मरण म्हणजे जीवनाचें उत्तर. जीवन कसें जगलों हें मरणकाळच्या स्थितीवरून दिसून येतें. मरणकाळच्या एका क्षणांत सारें जीवन प्रतिबिंबित होत असतें. अत्तराच्या एका थेंबांत ज्याप्रमाणें लाखों फुलांचा अर्क असतो, त्याप्रमाणें मरणकाळच्या एका क्षणांत जीवनांतील आपल्या अनंत कायिक, वाचिक व मानसिक कृतींचें सार सांठलेलें असतें.

आपण या जगांत सारे दुकान घालून बसलों आहोंत. दुकानदार असतो, तो रोज रात्रीं त्या त्या दिवसाची शिल्लक काढीत असतो. दिवसभर त्यानें शेंकडों उलाढाली केल्या; परंतु त्या सर्व उलाढालींचें सार इतका फायदा कीं इतका तोटा अशा सुटसुटीत उत्तरांत निघतें. तो रोजचा जमाखर्च पाहतो, महिन्याचा पाहतो. वर्षअखेर इतका तोटा किंवा इतका नफा असें म्हणतो. बारा वर्षें समजा दुकान चाललें. बारा वर्षांत इतकें कमावलें किंवा इतकें गमावलें असें एकाक्षरीं उत्तर तो काढतो. बारा वर्षांतील त्याच्या अपरंपार उलाढालींचें एवढें मिळविलें किंवा इतकें घालविलें एवढेंच सार निघतें.

आपलें सर्वांचें जीवन असेंच चाललेलें असतें. रात्रीं आपण अंथरुणावर पडलों म्हणजे दिवसां केलेल्या शेंकडों गोष्टी आठवत नाहींत. त्या दिवसाच्या महत्त्वाच्या चारदोन गोष्टी डोळयांसमोर असतात. त्या दिवशींच्या उलाढालींचें तेवढेंच फलित. एक महिना जातो. महिन्यांतील पांचदहा गोष्टी डोळयांसमोर राहतात. बाकीच्या गेल्या. वर्ष होतें. या वर्षांत काय केलें असा प्रश्न डोळयांसमोर येऊन दोनचार गोष्टी स्पष्टपणें डोळयांसमोर येतात. असें वर्षानुवर्ष होत जातें आणि मरतांना सर्व आयुष्याचें सार म्हणून कांहीं तरी फलित डोळयांसमोर उभें राहतें. या जीवनांतील ती कमाई. अंकगणितांतील तीं व्यवहारी अपूर्णांकांचीं उदाहरणें असतात. केवढाले ते

अपूर्णांक वाढतात ! परंतु शून्य किंवा एक असें सुटसुटीत उत्तर येतें. तसें आपल्या जीवनाचें आहे.

जीवनाचें हें शेवटचें उत्तर धन्यतेचें यावें म्हणून आपण धडपडलें पाहिजे. या जगांत आपण जन्माला आलों, तेव्हां आपण रडत आलों; परंतु सभोंवतींचे लोक आनंदले. त्यांनीं पेढे वाटले; परंतु मरतांना आपणांस आनंद होऊं दे व लोकांना रडूं दे. जीवन कृतार्थ झालें असें मनांत येऊन आपल्या तोंडावर मरतांना प्रसन्नता फुलूं दे आणि लोकांना म्हणूं दे, " अरेरे ! किती सुंदर याचें जीवन ! हा सुंदर मंगल दीप का आतां विझणार ? "

तुकारामांनीं म्हटलें आहे :

**" सोनियाचा कळश । माजीं भरला सुरारस "**

सोन्याचा देह मिळाला. त्यांत का वासना-विकारांची दारू भरून ठेवायची ? का मंगल जीवनाचा सुधारस भरावयाचा ? मरतांना गत जीवनांतील मंगल कार्यांची स्मृति येऊन कृतार्थ वाटणें याहून धन्यतर काय आहे ?

परंतु आपण प्रत्येक दिवशीं जर जपून न वागूं, तर मरणाचें सोनें होणार नाहीं. रोज वाटेल तसे वागाल तर मरतांना रडाल. सोन्यासारख्या आयुष्याची माती कराल. म्हणून जपून जाऊं या. रोज ध्येयाचें स्मरण ठेवून वागूं या. परमेश्वर जीवनांत शिरायला सर्वत्र उभा आहे. ज्याप्रमाणें दार उघडतांच वारा आंत घुसतो, प्रकाश आंत शिरतो, त्याप्रमाणें तुम्हीं हृदय जरा मोठें करतांच, बुद्धि जरा विशाल करतांच, दृष्टि जरा प्रेमळ व पवित्र करतांच परमात्मा आंत शिरेल. रवीन्द्रनाथ गीतांजलींत एके ठिकाणीं म्हणतात, " देवा, आयुष्यांतील कांहीं क्षणांवर दिव्यतेचे शिक्के होते. तुझी मुद्रा होती." प्रभु तुमच्या क्षणांवर दिव्यतेचा शिक्का मारावयास उभा आहे. तुम्ही प्रत्येक क्षण प्रभूसमोर घेऊन जा. प्रत्येक क्षण ध्येयार्थ जावो म्हणजे मरण मंगल होईल. ध्येयाची संतत धारा सदैव स्रवूं दे. जें आज तेंच उद्यां, जें या महिन्यांत तेंच पुढल्या; जें या वर्षीं तेंच पुढल्या वर्षीं; जें या जन्मीं तेंच पुढल्या; अशा रीतीनें जें थोर ध्येय मिळालें, त्याचा मागोवा घेत सारखे जाऊं या. ग्रह सूर्याभोंवतीं फिरून प्रकाशित होतात, त्याप्रमाणें ध्येयाभोंवतीं सतत कायावाचामनें करून प्रदक्षिणा घालीत राहून आपण आपलें जीवन प्रकाशित करूं या.

आठव्या अध्यायातील मरणाच्या भव्य रूपकाचा हा अर्थ आहे. मरण कसें यावें? त्या वेळीं कशी परिस्थिति असावी? कशी नसावी? याचें रूपकात्मक मनोहर वर्णन आठवा अध्याय देत आहे. दक्षिणायन असतांना मरूं नये. रात्र असूं नये. धूर असूं नये. कृष्णपक्ष असूं नये. या सर्वांचा अर्थ काय? दक्षिणायनांत दिवस लहान व रात्री मोठ्या म्हणजे कर्म करायला थोडा वेळ. तसेंच दक्षिणायन आलें म्हणजे आकाश मेघाच्छादित असतें. प्रकाश नाहीं. याचा अर्थ हृदयाकाश आसक्तीच्या ढगांनीं भरून गेलेलें असतें. रात्र असणें म्हणजे जीवनांत कर्मज्वाला धगधगीत पेटलेली नसणें, कर्तव्याचा प्रकाश नसणें. धूर असणें म्हणजे निःशंक ज्ञान नाहीं. सारेंच संशयी वातावरण. कृष्णपक्ष म्हणजे चंद्राचा क्षय होणें. चंद्र ही मनाची देवता. कृष्णपक्ष असणें म्हणजे मनाचा विकास झालेला नसणें. अशा स्थितींत मरण येणें म्हणजे दुर्दैव होय. ज्याच्या मरणप्रसंगीं आसक्ति जवळ उभी असेल, कर्महीनता समीप असेल, अज्ञानांधकार असेल, संशय असेल, मन खुरटलेलें असेल, त्याचें जीवन व्यर्थ गेलें. याच्या उलट, जो दिवसां मरतो, प्रकाश असतां मरतो, कर्मज्योति झगझगीत पेटत असतां मरतो, उत्तरायणांत म्हणजे हृदयाकाश निर्मळ असतांना, कर्म करायला मोठे दिवस असतांना अनासक्त मनानें जो मरतो, शुक्लपक्षांत म्हणजे मनाचा विकास होत असतां जो मरतो, तो धन्य होय! तें मरण म्हणजे जीवनच. परम थोर असें तें मरण असतें.

असें मरण यावें म्हणून आपण सारखी धडपड केली पाहिजे. आसक्ति, आलस्य, वासना-विकार या सर्वांना जिंकून घेतलें पाहिजे. कृष्णाची मुरली शरदृतूंत वाजली. ज्या वेळेस आकाश निर्मळ आहे, चांदणें पडलें आहे, फुलांचा सुगंध सुटला आहे, अशा वेळेस मुरली वाजते. आपल्या जीवनांत ती गोड मुरली जेव्हां वाजेल, तेव्हां सारे मोह आपण जिंकून घेऊं; सारखे अनासक्त रीतीनें, निष्काम बुद्धीनें जनताजनार्दनाची आपल्या स्वधर्मानुसार सेवा करीत राहूं. महात्माजी एकदां म्हणाले, "मला इतर आसक्ति उरली नाहीं; परंतु या चरख्याची काळजी वाटते. मरतांना रामनाम ओंठीं येण्याऐवजीं या चरख्याची चिंता नाहीं ना येणार? चरखा, चरखा, असें करीत नाहीं ना मरणार? चरख्यांत आंतडें गुंतून राहील काय?" स्वर्गीय जमना-

लालजी महात्माजींस म्हणाले, " तुम्ही चरख्याची चिंता नका करूं. तो मरणार नाहीं ! "

महात्माजींचें हें असें जीवन आहे. रात्रंदिवस कर्मज्वाला पेटून राहिली आहे. धूर नाहीं. आसक्ति नाहीं. सर्वत्र स्वच्छ प्रकाश. १९३१ सालीं आयर्विनसाहेबांजवळ वाटाघाटी करतां करतां रात्रीं दोन वाजले ; परंतु इतक्या रात्रीं घरीं आल्यावर सूत कांतायचें राहिलें, म्हणून चरखा हातीं घेऊन कांतणारे हे महात्माजी आहेत. प्रत्येक क्षण सेवेंत जात आहे. निर्मळ, निरपेक्ष, अनासक्त सेवा.

आपणहि नम्रपणें स्वतःचें जीवन कर्मज्वालेनें प्रकाशित करण्यासाठीं धडपडूं या. जीवनाचें सोनें करूं या. या मृण्मय शरीरांत अमृत मिळवूं या. तो शेवटचा दिवस गोड व्हावा म्हणून, धन्यतेचें मरण यावें म्हणून, जाणारा प्रत्येक दिवस नीट जगूं या; तरच शेवटीं तरणोपाय आहे.

● ● ●

## अध्याय ९ वा

नववा अध्याय अति पवित्र अध्याय. गंगेचा साराच प्रवाह पवित्र असतो. उगमापासून मुखापर्यंत सारा प्रवाह पवित्र असतो; पण तरीहि हरिद्वार, काशी, प्रयाग अशीं तीर्थें आपण मानिलीं आहेत. तेथली गंगा अधिकच पवित्र. तसे गीतेचे अठराहि अध्याय पवित्रच. परंतु त्यांतहि पुन्हां नववा अध्याय, बारावा अध्याय, पंधरावा अध्याय वगैरे अधिक पवित्र. नवव्या अध्यायाचा जप करीत अनेकांनीं समाधी घेतल्या. ज्ञानेश्वरमहाराज नववा अध्याय म्हणतच समाधिस्थ झाले असें म्हणतात. ज्ञानेश्वरींत ज्ञानेश्वर म्हणतात, " नवव्या अध्यायाची वेदांनाहि जणुं भीति वाटते." इतका हा अध्याय थोर आहे. पवित्र आहे.

या अध्यायाचें इतकें महत्त्व कां ? कारण येथें अनुभवाला येणारा राजमार्ग दाखविण्यांत आला आहे. भगवान् म्हणतात, " अर्जुना, तुला प्रत्यक्षावगम असा धर्म देतों." जी गोष्ट सांगोवांगीची नाहीं, तर प्रत्यक्षावगम आहे, तुमच्या-आमच्या अनुभवास येणारी आहे; अशी कोणती गोष्ट या अध्यायांत सांगितलेली आहे ? देव म्हणतात, " अर्जुना, जें कांहीं कर्म

करशील, तें ईश्वरार्पणबुद्धीनें कर." याचा अर्थ काय? आपण जीं जीं कर्में करतों, त्या कर्मांचा संबंध जनतेशीं असतो. तीं कर्में जनताजनार्दनाला मिळत असतात. ज्यांच्या ज्याच्याशीं आपल्या कर्मांचा संबंध येईल, त्यांना त्यांना देव मानणें म्हणजे ईश्वरार्पणबुद्धीनें कर्म करणें.

भक्त आपलीं स्वधर्मकर्में या दृष्टीनें करतात. गोरा कुंभार मडकीं घडवी. तीं मडकीं चांगलीं व्हावीं म्हणून तो माती किती तुडवी! माती तुडवितां तुडवितां तो तन्मय होऊन जाई. स्वतःचें मूल मातींत तुडविलें गेलें, तरी त्याला भान नाहीं. ती माती तुडवीत असतां जणुं परमेश्वर त्याच्या मनश्चक्षूं-समोर होता. हा कोठला परमेश्वर? मडकीं विकत घेणारे लोक म्हणजेच त्याचा परमेश्वर. गोऱ्या कुंभाराला दुसरा देव जणुं माहीत नाहीं. माझा नारायण मडकीं विकत घ्यायला येईल, त्याला का फसवूं? लौकर फुटणारें मडकें का त्याला विकूं? असें पक्कें मडकें त्याला देईन, कीं त्याच्या मुला-लाहि तें पुढें पुरेल. अशा भावनेनें गोरा कुंभार मडकीं तयार करी.

कबीर याच भावनेनें शेले विणी, वस्त्रें विणी. माझा परमेश्वर हीं वस्त्रें घ्यायला येईल. त्याच्या अंगावर का वेडींवांकडीं वस्त्रें घालूं? नाहीं, हीं वस्त्रें मला नीट विणूं दे. काळजीपूर्वक विणूं दे.

सांवता माळी याच भावनेनें भाजी विकायला आणी. धुऊन, निवडून तो भाजी घेऊन येई. भाजी घ्यायला येणारें गिऱ्हाईक म्हणजे जणुं त्याचा भगवंत. अशा रीतीनें आपण सर्वत्र परमेश्वर पाहूं या. परमेश्वराला शोधावयासाठीं दूर जायला नको. तो आपल्या आसपास सर्वत्र आहे. आपण काशीला, रामेश्वराला जातों; परंतु देव का तेथेंच आहे? मध्यें सारें का स्मशान आहे? एकनाथाचा मुलगा काशीची कावड घेऊन रामेश्वराला ती ओतण्यासाठीं जात होता; परंतु नाथांनीं त्या गंगेनें तृषार्त गर्दभाची तृषा शमविली. मुलगा रागावला; परंतु रामेश्वर त्याच्या स्वप्नांत आले व म्हणाले, "अरे, गाढवाला पाजलेली गंगा मला मिळाली हो!"

टॉल्स्टॉयनें अशीच एक सुंदर गोष्ट लिहिली आहे. दोन मित्र यात्रेसाठीं निघतात; परंतु एक मित्र वाटेंतील दुष्काळी गांवांत जातो. तेथल्या दुष्काळ-पीडितांस जगवितो. पैसे संपल्यामुळें यात्रेच्या स्थानीं न जातां तो तसाच परत येतो; परंतु यात्रेच्या ठिकाणीं गेलेल्या त्या दुसऱ्या मित्राला स्वतःचा

मित्र देवाजवळ दिसतो. दुष्काळग्रस्तांची केलेली ती सेवा देवाला पावली. यात्रेला न जातांहि तो मित्र देवाजवळ जाऊन बसला.

आपण जेथें पाहूं तेथें परमेश्वरच आहे; परंतु आपण आंधळे आहोंत. भगवान् मोठ्या खेदानें म्हणतात :

" अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् "

आपण झाडामाडांत देव पाहतों. दगडाधोंड्यांत देव पाहतों. भुताप्रेतांत पाहतों; परंतु मानवांतील देव आपणांस दिसत नाहीं! आपणांस चार तोंडांचा, आठ हातांचा असा देव पाहिजे असतो. मनुष्याहून कांहीं तरी निराळा असा देव आपणांस हवा असतो. मनुष्याच्या रूपानें आपल्या शेजारीं उभा असलेला परमेश्वर आपणांस दिसत नाहीं. या मानवाजवळ आपण भांडतों, त्याला गुलाम करतों, त्याची कत्तल करतों आणि देवाची पूजा करूं पाहतों! भगवंतांना याचें आश्चर्य वाटतें. अरे, मनुष्यांतील देव आधीं पहा. हा बोलता-चालता देव आहे. याचें स्वरूप बघ. याला काय हवें-नको तें पहा. दगडाच्या देवाला काय काय आवडतें हेंहि आपण ठरवून टाकलें आहे. गणपतीला मोदक आवडतो. विठोबाला लोणी आवडतें. खंडोबाला खोबरें हवें. परंतु मानवाला काय हवें याची कधीं विवंचना आपण करतों का? आपल्या सभोंवतीं हा दोन हातांचा मनुष्यरूपी देव उभा आहे. त्याच्या पोटांत अन्न नाहीं. त्याच्या अंगावर वस्त्र नाहीं. त्याच्या पूजेला येतां का धांवून ?

परमेश्वराला प्रदक्षिणा घालाव्या असें म्हणतात. एक प्रदक्षिणा घालावयाची व देवाचें रूप न्याहाळून पहावयाचें. अशानें देवाचें रूप अंतरीं ठसतें; परंतु हा देव कोठें आहे? लाखों खेड्यापाड्यांतून हा देव उभा आहे. या खेड्यांना प्रदक्षिणा घाला. म्हणजे तेथील दरिद्री नारायणाचें स्वरूप तुमच्या ध्यानांत येईल. त्याची काय दशा आहे हें तुम्हांला कळेल. त्याच्या सेवेसाठीं मग तुम्ही जाल.

असा हा रोकडा भक्तिधर्म आहे. प्रत्यक्षावगम धर्म आहे. तुमच्या बंधूंची सेवा करा; त्यांचीं सुकलेलीं तोंडें फुलतील. तुम्हांला परमसुख होईल. आपल्या सभोंवतीं असलेले लोक म्हणजेच भगवंत असें मनांत येऊन जर आपण कर्में करूं, तर तीं कर्में किती सुंदर होतील! त्या कर्मांत एक प्रकारचें तेज येईल.

आपला एकादा साधा मित्र यावयाचा असला, तरी आपण किती काळजी-पूर्वक मनापासून सारें करतों. मग हा प्रत्यक्ष परमेश्वर आहे असें मानूं, तर किती दक्षतेनें व हृदय ओतून तें कर्म करूं? कलकत्यांत एक महाराष्ट्रीय संन्यासिनी होती. तिनें मुलींची एक शाळा चालविली होती. एकदां विवेकानंद तिच्या भेटीसाठीं गेले होते. त्यांनीं विचारिलें, "माईजी, काय चाललें आहे?" ती तपस्विनी म्हणाली, "या देवतांची सेवा करीत आहें." ती संन्यासिनी त्या मुलींकडे किती आदरानें व भक्तीनें पहात होती! शिक्षकानें मुलांकडे याच दृष्टीनें पहावें. त्यांना दगड आहेस, नंदीबैल आहेस, असें म्हणूं नये. माझ्या समोरच्या मुलांत दिव्यता आहे. ती प्रकट व्हावी म्हणून मला उद्योग करावयाचा आहे, स्वतःमधील दिव्यता या मुलांनीं प्रकट करावी म्हणून त्यांना साहाय्य देण्यास मी उभा आहें, अशा भावनेनें शिक्षक वागेल तर तें अध्यापनकर्म कसें दिव्य होईल!

मी एकदां एका शहरीं गेलों होतों. गव्हर्नर यायचे होते. गटारें साफ केलीं जात होतीं. झाडलोट होत होती. गव्हर्नर येण्याआधीं त्या गांवांत का माणसें रहात नव्हतीं? परंतु म्युनिसिपालिटीच्या सभासदांना व अध्यक्षांना गव्हर्नर देव वाटला! तो येणार म्हणून ते स्वच्छता करूं लागले. बाकीची पन्नास हजार जनता? तिच्या प्राणांची जणुं किंमत नाहीं! आपल्या शहरांतील सर्व लोक म्हणजेच परमेश्वराचीं रूपें असें मनांत वागवून म्युनिसिपालिटीचे सभासद वागतील, तर म्युनिसिपल कारभार, बोर्डाचा कारभार किती निराळा होईल! असा हा थोर मानवधर्म नववा अध्याय सांगत आहे. सर्वत्र परमेश्वर पाहून त्याची तुझ्या कर्ममय पुष्पांनीं पूजा कर, मानवांतील देव पहा, त्याला सुखी करण्यासाठीं ऊठ, असा संदेश हा नववा अध्याय देत आहे.

आणि सर्वत्र परमेश्वर जो पाहूं लागला तो कोणाला तुच्छ मानणार, हीन मानणार? तो कोणाला अस्पृश्य म्हणून दूर लोटणार? ज्ञानेश्वर म्हणतात, माझ्या भक्ताला मग जातिभेद दिसत नाहीं.

"तेथ जातिव्यक्ति पडे बिंदुलें"

जातिभेद, व्यक्तिभेद, यांच्या नांवानें शून्याकार होतो. सर्वत्र मंगल परमात्माच दिसतो.

कर्म कोणतेंहि असो, तें ईश्वरार्पण भावनेनें जर आपण करूं तर सारे मुक्त होऊं. नववा अध्याय मोक्षाचीं दारें सर्वांना सताड उघडीं करीत आहे.

" स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् "

स्त्रिया असोत, वैश्य असोत, शूद्र असोत, कोणीहि असो; आपापल्या सेवाकर्मानें सर्वांना मोक्ष मिळेल. जी स्त्री पति हाच परमेश्वर मानते, त्याच्या सुखदुःखांत स्वतःचें सुखदुःख पाहते, पतीची इच्छा तीच स्वतःची इच्छा असें जी करते, तिला मोक्ष नाहीं मिळायचा तर कोणाला?

प्रश्न इतकाच आहे, कीं जें कर्म तुम्ही करतां तें कोणत्या भावनेनें करतां? तें जनताजनार्दनाला, समाजरूपी भगवंताला अर्पण करावयाचें आहे या भावनेनें करतां, कीं केवळ स्वार्थानें करतां, या गोष्टीला महत्त्व आहे. नववा अध्याय फार थोर दृष्टि देत आहे. ती मिळाली तर जीवनांत क्रान्ति येईल. कबिरानें म्हटलें आहे :

> गुरुकृपांजन पायो
> पायो मैने भाई
> रामबिना कछु जानत नाहीं॥
> अंदर राम बाहिर राम
> जहाँ देखों वहाँ रामहि राम॥

मग सर्वत्र प्रभुदर्शन होईल. त्या प्रभूची सेवा करण्यासाठीं तुम्ही धांवाल. व्हिट्मन् या कवीला हिरवें हिरवें गवत पाहून हा त्या प्रभूचा हातरुमाल आहे असें वाटलें. शेक्स्पिअर म्हणतो, " मग त्या मनुष्याला पाषाणांतून प्रवचनें ऐकूं येतील, निर्झरांतून वेद मिळतील." एकदां ही दृष्टि यायला हवी. सर्वत्र मांगल्य पाहण्याची दृष्टि. सर्वत्रच प्रभूचा साक्षात्कार.

ही थोर दृष्टि यावी म्हणून आपण धडपडूं या. ज्यांची ज्यांची सेवा करावयास आपण जाऊं, ते प्रभूचीं रूपें आहेत असें मानून सेवा करूं या. मग कंटाळा वाटणार नाहीं. सेवेंत रस वाटेल. एक प्रकारची मुक्तावस्था जीवनांत येईल. हृदयांत अपार आनंद भरेल. मोक्ष तो आणखी काय?

● ● ●

# अध्याय १० वा

नववा अध्याय सर्वत्र प्रभुरूप पहा असें सांगतो.

> पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति
> तदहं भक्त्युपहृतं अश्नामि प्रयतात्मनः ॥
> यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्
> यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥

हा जो नवव्या अध्यायाचा संदेश तो एकदम कृतींत कसा आणावयाचा? सर्व कर्में ईश्वरार्पणबुद्धीनें करावयास कसें शिकावयाचें? हजारोंशीं आपल्या कर्मद्वारा आपला संबंध येतो. ज्यांच्या ज्यांच्याशीं संबंध येतो, तीं सारीं भगवंताचीं रूपें आहेत असें एकदम वाटेल का?

एकदम ही दृष्टि येणार नाहीं. मूल जसें हळूहळू शिकत जातें, तसें आपणांस शिकत गेलें पाहिजे. भगवान् या दहाव्या अध्यायांत एकाद्या कुशल शिक्षकाप्रमाणें जणुं धडे देत आहेत. लहान मुलाला आपण प्रथम सोपीं अक्षरें काढून देतों. सोपीं व ठसठशीत अशीं अक्षरें त्याच्या पाटीवर आपण काढून देतों. मोठा ग काढतों व त्याला सांगतों कीं हा गवताचा ग. मोठा म काढून हा मगराचा म असें आपण शिकवितों. प्रथम ग म भ न अशीं सोपीं अक्षरें शिकवितों. मग स प वगैरे जरा कठिण अक्षरें. शेवटीं जोडाक्षरें. एवढेंच नव्हे, तर प्रथम जो मोठा ग होता तोच लहानहि असतो हें शिकवावें लागतें. ग मोठा ठसठशीत असला काय, किंवा बारीक असला काय, त्यांतील अर्थ एकच ही गोष्ट मुलाला समजावून द्यावी लागते. नाहीं तर त्या जांवई-बुवांच्या गोष्टींतला प्रकार व्हायचा! जांवईबोवा पत्रांतील बारीक श्री पाहून रडूं लागले! ते म्हणाले, "माझ्या पाटीवर केवढी मोठी श्री असे! ही पत्रांतील श्री रोड कां झाली?" ती बारीक श्री व ती मोठी श्री यांत कांहीं फरक नाहीं. एकच अर्थ दोहोंत भरला आहे. लहान मूल अशा रीतीनें शिकत जातें. प्रथम सोपीं व ठसठशीत अक्षरें, मग जरा कठिण अक्षरें; मग तींच बारीक अक्षरें. तसेंच तीं जोडाक्षरें. एवढें सारें झाल्यावर त्या मुलाची मग वाङ्मयांत प्रगति होते. तो वाचूं लागतो. काव्याचा आनंद चाखूं लागतो.

या सृष्टीचा विशाल ग्रंथ या रीतीनेंच वाचायला आपण शिकलें पाहिजे. सृष्टींत सर्वत्र प्रभु भरलेला आहे. त्याचें रूप वाचायला शिकायचें आहे ; परंतु एकदम बारीक अक्षरें वाचतां येणार नाहींत. जोडाक्षरें एकदम उलगडणार नाहींत. म्हणून भगवान् सृष्टींतील ठसठशीत अक्षरांचा धडा अर्जुनाला देतात. ते म्हणतात, "अर्जुना, तुला एकदम सर्वत्र परमेश्वर नाहीं पाहतां येणार; परंतु संतांच्या ठिकाणीं तरी पाहतां येईल ना? जे संत रात्रंदिवस परार्थ झिजत असतात, जे निंदास्तुतीनें विचलित होत नाहींत, मरणाचें ज्यांना भय नाहीं, अशा संतांच्या ठिकाणीं तुला अनंताची मूर्ति नाहीं का पाहतां येणार? संत हा सोपा शब्द आहे. ठसठशीत, डोळ्यांत भरेल असा हा शब्द आहे. हा शब्द घे, वाच, घोक. आणि तुझी जन्मदात्री माता? 'मातृदेवो भव' अशी श्रुतीची आज्ञा आहे. परमेश्वराच्या परम कारुण्याची कल्पना आईच्या वात्सल्यावरूनच आपणांस करतां येईल. त्या मातेला कळत नाहीं, तिचें आंतडें त्या मुलासाठीं इतकें कां तुटतें तें! कोणीं लावली इतकी माया? मुलावर किती तिचें प्रेम! त्याला जरा दुखलें-खुपलें कीं ती कावरीबावरी होते. पायांचा पाळणा करते, डोळ्यांचा दिवा करते. अशी ही प्रेममयी, स्नेहमयी माता. फ्रेंच भाषेंत एक गोष्ट आहे : एक आई होती. तिचा मुलगा व्यभिचारी निघाला. तो एका वेश्येकडे जावयाचा. सारें घर त्यानें तिच्या घरांत भरलें. तरी त्याच्या प्रेमाची सत्यता तिला पटेना. तो म्हणाला, "आतां मी काय करूं म्हणजे माझें प्रेम तुला पटेल?" ती म्हणाली, "तुमच्या आईचें काळीज कापून तें मला आणून द्या!" त्यानें आईचें काळीज कापून घेतलें. एका ताटांत घालून लगबगीनें तें घेऊन तो निघाला; परंतु ठेंच लागून तो पडला. हातांतील ताट पडलें; परंतु त्या काळजांतून आवाज आला, "बाळ, तुला नाहीं ना रे कोठें लागलें?" अशी ही निरपेक्ष प्रेम करणारी माता! तिच्या ठिकाणीं देव पहायला शीक. हें ठसठशीत सोपें अक्षर आहे. आणि तुझें पशुत्व नष्ट करून तुला मनुजता देणारी गुरुमाउली? त्या गुरूच्या ठिकाणींहि प्रभुरूप पहायला शीक. आणि लहान मुलें? निष्पाप व सरळ. प्रभु-संगीताच्या त्या लकेरी? त्या लहान मुलांच्या ठायीं देव पहा. लहान मुलांना किती लौकर देव मिळाला. ध्रुव, प्रल्हाद, चिलया, सनक, सनंदन, शुकाचार्य, सारीं लहान मुलें; परंतु त्यांनीं क्षणांत परमेश्वर मिळविला. मुलांच्या ठायीं

देव पहायला शीक आणि मानवेतर सृष्टींतीलहि ठळक अक्षरें पहा. तो पहा भव्य हिमालय कसा उभा आहे. जणुं ज्ञानवैराग्याची शुभ्र मूर्ति! इवलीहि चंचलता तेथें नाहीं. मूर्तिमंत स्थिर निष्ठा जणुं ती उभी आहे. त्या हिमालयाच्या ठिकाणीं परमेश्वर पहा. आणि ती गंगा?

> पोषीत तीरींचे पादप। फेडीत जगाचे पापताप
> जाय जैसें आप। जाह्नवीचें॥

सर्व भूप्रदेश हरितश्यामल करीत जाणारी ती गंगा! रवीन्द्रनाथांना नद्यांचे प्रवाह पाहतांच जणुं उचंबळून येत असे. ते म्हणतात :

> "जाह्नवि-जमुना विगलित करुणा"

गंगा-यमुना म्हणजे ईश्वराची वाहती करुणा आहे! अशा या थोर नद्यांच्या ठायीं प्रभुरूप पहा.

आणि वरचें हें अनंत आकाश? वादळें येतात व जातात. धूळ उडते. धुकें येतें. मेघमाला येतात. परंतु आकाश निळें निळें पाठीमागें उभें आहे. इवलाहि मळ स्वतःला लागूं देत नाहीं. या आकाशाच्या ठायीं परमेश्वर पहा.

आणि हा उचंबळणारा अनंत सागर? भरती असो वा ओहोटी असो, तो सारखा धों धों करीत आहे. "मामनुस्मर युद्धय च" अशी जणुं घोषणा करीत आहे. भरती असो वा ओहोटी असो, तूं कर्म करीत रहा, असें जणुं तो धीरगंभीर वाणीनें सांगत आहे. जणुं ॐ ॐ ची गर्जना रात्रंदिवस करीत आहे. पाऊस पडो वा न पडो, तो सदैव उचंबळतच असतो. सर्व प्रवाहांना जवळ घेतो. कधीं शांत, तर कधीं अत्यंत भयंकर! असा हा सागर त्याच्या ठायीं मला पहा. तो इंग्रज कवि बायरन समुद्र पाहून उचंबळे, नाचे. तो म्हणतो, "सागरा, कर, गर्जना कर. तुझ्या लाटांचा कल्लोळ सुरू ठेव. ये, नाचत नाचत ये. अरे सागरा, तूं त्या अदृश्य परमेश्वराचें जणुं सिंहासन आहेस." अशा या सागराच्या ठायीं भव्य-दिव्य परमेश्वर नाहीं पहायचा, तर कोठें पहायचा?

आणि ती कोकिळा? वसंतऋतु येतांच जी कुऊ कुऊ करूं लागते. कोठें आहे तो प्रभु, उन्हाळ्यांत झाडांना नव पल्लव देणारा तो प्रभु कोठें आहे, असें जणुं ती विचारते. जणुं पहांटेपासून उपनिषद् गाते. त्या कोकिळेच्या ठिकाणीं देव मान. आणि ज्याचा पिसारा पाहून शहाजहान बादशहाचें

मयूरासन फिके पडावें असा तो सुंदर मोर? मेघांचा गडगडाट ऐकून नाचणारा, केकारव काढणारा, सरस्वतीचें दिव्य वाहन होणारा, त्या मोराच्या ठिकाणीं परमेश्वर पहा. आणि गोमाता? गाय म्हणजे करुण काव्य आहे. किती कोमळ, प्रेमळ व स्वच्छ! ती दूध देते. शेतीला बैल देते. तिच्या ठिकाणीं देवरूप पहा.

आणि अर्जुना, हीं सोपीं अक्षरें तुला सांगितलीं; परंतु कठिण अक्षरें व जोडाक्षरेंहि तुला शिकावीं लागतील. एरव्हीं हा विश्वग्रंथ वाचतां येणार नाहीं. संतांच्या ठिकाणीं देव पहायला तूं शिकशील; परंतु रावणाच्या ठिकाणींहि देव पहायला तुला शिकलें पाहिजे. रावण हें जोडाक्षर आहे. गायीच्या ठिकाणीं देवत्व पहाशील, परंतु व्याघ्राच्या भीषणतेंतहि प्रभुरूप पहावयास शीक. फुलाच्या ठिकाणीं प्रभुरूप पाहूं शकशील, परंतु त्या तेजस्वी नागाच्या ठिकाणींहि प्रभु पहा. एकदां पाण्हरीबाबांना साप चावला; परंतु ते म्हणाले, "प्रभु आला व चुंबन देऊन गेला." सर्पाच्या ठिकाणीं त्यांना प्रेमळ परमेश्वर दिसला! अशीं हीं जोडाक्षरें शिकून, बारीक अक्षरेंहि शेवटीं शिकलें पाहिजे. गंगेच्या ठायीं प्रभु पाहिला, परंतु दंवबिंदूंतहि तो मला दिसला पाहिजे. आकाशाला कवटाळूं पाहणाऱ्या, हजारों पक्ष्यांना आश्रय देणाऱ्या शीतळ वटवृक्षाचे ठायीं देव मानणें सोपें आहे; परंतु लहान तृणाच्या ठायींहि ईश्वरी प्रभा पहावयास आपण शिकलें पाहिजे.

अशा रीतीनें आपण शिकत गेलें पाहिजे. म्हणजे सर्वत्र परमेश्वरच दिसेल. सारेंच जसें गोड. त्या वैदिक मंत्रांत ऋषि म्हणतो ना:

> "मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिन्धवः
> माध्वीर्गावो भवन्तु नः
> मधु नक्तमुतोषसि, मधुमत्पार्थिवं रजः"

सारेंच गोड! वारे गोड, तारे गोड. दिवस गोड, रात्रहि गोड. नद्या गोड, गायी गोड. मातीचा कणहि गोड! ज्या मातीच्या कणांतून फुलांना रूप-रस-गंध मिळतात, फळांना रस-रंग मिळतात, तो मातीचा कण का सुंदर नाहीं?

अशा रीतीनें शिकत शिकत आपण जाऊं या. हा विश्वग्रंथ आपण वाचूं या. रवींद्रनाथ म्हणतात, "परमेश्वर फुलांच्या रूपानें, ताऱ्यांच्या रूपानें, आकाशांतील अनंत रंगांच्या रूपानें, पांखरांच्या रूपानें, वायुलहरींच्या रूपानें

आपणांस पदोपदीं-क्षणोक्षणीं संदेश पाठवितो. पत्रें पाठवतो. परंतु हीं वाचणार कोण ?"

हीं पत्रें वाचायला शिकला तो खरा ज्ञानी. तो खरोखर शिकला. बाकीची सारी पोपटपंची आहे. ज्ञानाचा मिथ्या भार आहे. तें मंगलमय ज्ञान आपण मिळवूं या. विश्वग्रंथांत सर्वत्र प्रभुरूप पहायला शिकून मुक्त होऊं या. आनंद-सिंधूंत डुंबूं या.



# अध्याय ११ वा

हा वा अध्याय आपणांस सर्वत्र ईश्वर पहा असें सांगून राहिला आहे; परंतु अर्जुनानें प्रश्न विचारला, "देवा, सर्वत्र तूंच दिसलास तर तें रूप कसें रे दिसेल? मला कल्पनाहि करतां येत नाहीं. हें सारें स्थिरचर व्यापून तूं भरून राहिला आहेस, असें तें विराट् दर्शन मला घडव. माझे मनोरथ पूर्ण कर." आणि प्रभूनें तें विश्वरूपदर्शन दिलें आहे. तो विश्वंभर सर्वत्र भरून राहिलेला अर्जुनाला दिसला. तें अनंत तेजोमय असें रूप पाहून अर्जुन घाबरला. तो म्हणाला, "आंवर आंवर, हें तुझें विश्वरूप आंवर. मला नाहीं हें पाहवत. माझे डोळे दिपतात. तुझें साजिरें-गोजिरें रूपच मला पुरे!"

मनुष्याला आजुबाजूला असलेला दोन हातांचा परमेश्वर पटत नाहीं; परंतु अनंत हातांचा हा विराट् परमेश्वर, तो पचत नाहीं. अर्जुन शहाणा होता. शेवटीं दोन हातांचा परमेश्वर त्याला पटला. त्याच्या रथावर चार हातांचा श्रीकृष्ण होता; परंतु दोन हातांचाहि त्याला आवडला. मानवदेहांत असणारा परमेश्वर आपणांस पुरेसा आहे. मानवाची सेवा करूं या. या मनुष्यरूपी नारायणाची उपासना करूं या. त्याला सुखी करूं या.

या अकराव्या अध्यायांत एकच सूर भरून राहिला आहे. भक्तांना अत्यंत आवडणारा असा हा अध्याय आहे. लोकमान्यांचें गीतारहस्य प्रसिद्ध झालें तेव्हां महर्षि अण्णासाहेब पटवर्धन म्हणाले, "त्या अकराव्या अध्यायाविषयीं बाळानें काय बरें लिहिलें आहे? तेवढें वाचावेंसें वाटतें." असा हा अकरावा अध्याय जणुं स्तोत्ररूप आहे. अनंताचें तें भव्य स्तोत्र आहे. ज्ञानेश्वरींत फारच मधुर ओंव्या आहेत. अर्जुन म्हणतो, "देवा, नमस्कार नमस्कार. मागें नमस्कार,

पुढें नमस्कार !" पुन्हां पुन्हां जणुं नमो नमो म्हणत तो राहिला. जेथें पहावें तेथें प्रभुरूप. अर्जुन केवळ हात जोडून विनम्र भावानें उभा राहिला. अशा ह्या स्तोत्ररूप अध्यायाचें सार एकच आहे आणि तें म्हणजे परमेश्वर सारें करून राहिला आहे. आपणांस कशाचाहि अहंकार नको. मीच जणुं सारें करणारा असा गर्व कोणीहि करूं नये. तें हास्यास्पद आहे. आपण विश्वशक्तीच्या हातां-तील बाहुलीं आहोंत. ती विश्वशक्ति आपणांस नाचवीत असते. मिल्टन या इंग्रज कवीनें एके ठिकाणीं म्हटलें आहे, "मी आंधळा झालों म्हणून का देवाचें काम अडणार आहे? असा अहंकार मला नको. त्या परमेश्वराचें काम करावयास हजारों तयार आहेत." गोष्ट सत्य आहे. आपण केवळ निमित्त आहोंत.

जगांतील परिस्थिति, जगांतील अनेक प्रवाह, अनेक शक्ती, विश्वांतील अनंत गति आपणांस भ्रमवीत आहेत. आपल्या मनांत असतें तसें थोडेंच होतें? जगांतील निरनिराळया इच्छांचे, प्रयत्नांचे, शक्तींचे परस्परांवर आघात-प्रत्याघात होत कांहीं तरी एक फलित निष्पन्न होत असतें. आपण आपल्यापरी धडपडत रहावें; परंतु मनांत कष्टी होऊं नये. कर्ता-करविता शेवटीं तो विश्वंभर आहे. त्याच्या विश्वात्मक गतीनें व शक्तीनें जो कांहीं आकार येईल तो खरा; त्याला जसें रूप पाहिजे असेल तसेंच शेवटीं येईल.

आपण नम्रपणें निमित्तमात्र होऊन कर्तव्य करीत रहावें. प्रभूच्या हातांतील आपण साधनें बनूं या; परंतु ईश्वराच्या हातांतील साधन होणें ही सोपी गोष्ट नाहीं. त्या परम थोर प्रभूनें आपणांस वापरावें यासाठीं आपण आपलें जीवन निर्मळ करून ठेवूं या, आपलें जीवन सतेज करून ठेवूं या. जीवनाला नीट धार लावून ठेवूं या. तें संयमाग्नींत घालून नीट तावून-सुलाखून ठेवूं या. एकाद्या मोठ्या माणसानें आपणाजवळ चाकू मागितला, तर त्याला नीट धार आहे कीं नाहीं तें आपण पाहतों. बोथट चाकू त्याच्या हातांत द्यायला आपणांस लाज वाटेल. कोणाचा तरी चांगला चाकू घेऊन तो आपण नेऊन देऊं. त्याप्रमाणें प्रभूनें जर आपलें जीवन मागितलें, तर तें निर्मळ व सतेज असेल तरच आपण त्याच्यासमोर तें नेऊं शकूं.

एका इराणी कवीनें म्हटलें आहे, "हे मृत्तिके, तूं माझ्या ओठांचें चुंबन घेऊं इच्छितेस का? तर मग पेल्याचा आकार घेऊन भट्टींत भाजून घे. मग तो पेला माझ्या ओठांना स्पर्श करूं शकेल. हे लाकडाच्या तुकड्या, माझ्या सुंदर

केशकलापास स्पर्श करावा असें का तुला वाटतें ? तर स्वतःला कर्वतून घे. कापून घे. कंगोरे पाडून घे. तूं फणी बन. मग ती माझ्या केसांत फिरेल, केसांशीं खेळेल."

त्यागानें, तपस्येनें मोल चढतें. आपण आंवळ्यांना टोंचतों. त्यांचा मग मुरावळा होतो. तो मग सुंदर कांचेच्या बरणींत बसतो. त्याची किंमत वाढते. रस्त्यावर पडलेला तो भिकारडा आंवळा; परंतु तो शिंक्यांत जाऊन बसतो. साऱ्या जीवनांत हा कायदा दिसून येईल.

ईश्वराच्या हातांतील साधन होतां यावें म्हणून आपण तपस्या केली पाहिजे. निरहंकारी झालें पाहिजे. तुमच्या-आमच्या जीवनाच्या बांसरींतून प्रभूनें संगीत निर्मावें असें वाटत असेल, तर ही जीवनाची बांसरी अंतर्बाह्य पोकळ करून ठेवूं या. तरच देवाचा वारा तिच्यांतून फुंकिला जाईल, संगीत निर्माण होईल; परंतु आपल्या अहंकारानें, आपल्या क्षुद्र स्वार्थी वासना-विकारांनीं जर आपली जीवनाची बांसरी भरून गेली असेल, ही बांसरी पोकळ न होतां भरून गेली असेल, तर प्रभु तिच्यांतून वारा कसा फुंकील ? संगीत कसें प्रकट होईल ?

**" तुझ्या करांतील बनून पांवा**
**कृतार्थ हा जन्म मदीय व्हावा "**

असें देवाजवळ ज्याला म्हणावयाचें आहे, त्यानें आपल्या जीवनाची बांसरी पोकळ करून ठेवावी. नम्रतेशिवाय कांहींएक नाहीं. नम्रता हा ज्ञानाचा आरंभ. नम्रता नसेल तर जीवन वाढणार नाहीं. समर्थांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे :

**" नेणतेपण सोडूं नये "**

आपण नेणते आहोंत ही भावना कधीं सोडूं नये. विहिरींत अपरंपार पाणी असतें; परंतु विहिरींत सोडलेली घागर जर वांकणार नाहीं, तर तें पाणी तिच्यांत कसें शिरेल ? ती अहंकारानें नाचत राहील, तर रितीच राहील. प्रभूचें संगीत सर्व विश्वांत भरून राहिलें आहे. तें तुमच्या-आमच्या जीवनांतूनहि प्रकट होईल; परंतु आपण वांकूं तर, विनम्र होऊं तर; त्याच्या हातांतील आपण निमित्तमात्र साधनें आहोंत अशा भावनेनें वागूं तर. अहंकाराचा वारा लागूं न दिला तर. असें करूं तर आपलेंहि हें जीवन कृतार्थ होईल.

● ● ●

# अध्याय १२ वा

सातव्या अध्यायापासून आपण बाराव्या अध्यायापर्यंत आलों. भक्तीच्या ऊहापोहाचा हा शेवटचा अध्याय. हा लहानसा वीस श्लोकांचा अध्याय गोड आहे. अति पवित्र असा हा अध्याय आहे. कर्मवीर महर्षि अण्णासाहेब कर्वे यांनीं आपल्या आत्मचरित्रांत मी बाराव्या अध्यायांतील श्लोक रोज गुणगुणत असतों असें लिहिलें आहे. हा अध्याय सर्वांनीं पाठ करावा, म्हणावा. जीवनावर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं.

या बाराव्या अध्यायांत अर्जुनानें एक प्रश्न विचारला आहे. पांचव्या अध्यायांत ज्याप्रमाणें संन्यासी श्रेष्ठ कीं कर्मयोगी श्रेष्ठ असा प्रश्न आहे, त्याप्रमाणें येथें निर्गुणाचा उपासक तुला अधिक आवडतो, कीं सगुणाचा उपासक तुला अधिक आवडतो, असा प्रश्न आहे. तेथें पांचव्या अध्यायांत भगवंतांनीं उत्तर दिलें होतें कीं, "अर्जुना, अरे संन्यासी वा कर्मयोगी हे दोघे सारखेच हो. त्यांच्यांत द्वैत पाहणें, फरक पाहणें हें मूर्खपणाचें आहे. परंतु त्यांतल्या त्यांत पहायचेंच झालें, तर कर्मयोग समजण्यास जरा सोपा म्हणून तो विशेष, असें म्हणावें पाहिजे तर." हें जसें तेथें उत्तर देण्यांत आलें आहे, तसेंच उत्तर येथेंहि आहे. सगुण भक्त तुला आवडतो, कीं निर्गुण आवडतो? प्रभु या प्रश्नाचें काय उत्तर देणार? एकाद्या मातेला दोन मुलगे असावेत. एक चांगला मिळवता आहे. आईपासून दूर रहातो आहे आणि दुसरा आईला क्षणभरही सोडूं शकत नाहीं. त्या मातेला जर तुम्हीं विचारलेंत कीं, "हे माते, या दोन मुलांपैकीं तुला कोणता आवडतो?" तर ती माता काय उत्तर देईल? ती म्हणेल, "दोन्ही मला सारखेच आवडतात; परंतु हा लहानगा आहे ना, त्याला माझ्याशिवाय चैन पडत नाहीं, सारखा भोंवतीं भोंवतीं असतो. माझ्या पायांजवळ घुटमळतो; परंतु दोन्ही मला प्रियच आहेत."

जीवनांत सगुण व निर्गुण दोहोंचा अनुभव हवा, तरच जीवनाला पूर्णता येईल. आपण सारे प्रथम सगुणपूजक असतों. बुद्धधर्मांत तीन गोष्टी सांगितल्या आहेत :

१ बुद्धं शरणं गच्छामि ।
२ संघं शरणं गच्छामि ।
३ धर्मं शरणं गच्छामि ।

आपण प्रथम एखाद्या महात्म्याभोंवतीं गोळा होतों. भगवान् बुद्धासारखी थोर विभूति उभी राहिली कीं त्या मूर्तीभोंवतीं आपण रुंझी घालूं लागतों. लोकमान्य टिळक होते, त्यांच्या भोंवतीं लाखों उभे राहिले. महात्माजी आले, लाखों त्यांच्या भोंवतीं जमले. अशा रीतीनें सगुण मूर्ति डोळ्यांसमोर ठेवून आपण जात असतों. कोणाची तरी मूर्ति डोळ्यांसमोर हवी. बुद्धांची घ्या, लोकमान्यांची घ्या, महात्माजींची घ्या. त्या मूर्तीसमोर आपण उभे राहतों आणि प्रकाश मिळवितों; परंतु देह हा जाणारा आहे. साऱ्या मूर्ती, सारे आकार मोडायचे आहेत, मातींत जायचे आहेत. मूर्ति मोडली तर का रडत बसणार? समर्थांच्या प्राणोत्क्रमणाची वेळ जवळ आली. सारे शिष्य रडूं लागले. तेव्हां समर्थ म्हणाले, "हेंच का शिकलेत? अरे, माझी पार्थिव मूर्ति लोपली तरी चिन्मय मूर्ति आहे. दासबोधाच्या रूपानें मीच आहे."

आपण मंगलमूर्तीची प्रतिमा आणतों. तिचा उत्सव करतों. त्या प्रतिमेची पूजा करतों; परंतु शेवटीं ती मूर्ति बुडवावयाची असते. सगुणांतून निर्गुणाकडे जायचें असतें. 'बुद्धं शरणं गच्छामि' या पायरीवरून आपण 'संघं शरणं गच्छामि' या पायरीवर येतों. बुद्ध निर्वाणाला गेले. पुढें काय? पुढें बुद्धांच्या मताचे जे जे ते एकत्र येतात. स्वतःचा संघ करतात. जणुं सामुदायिक मूर्ति बनवितात. या संघाच्या आधारानें राहूं पाहतात; परंतु संघ तरी कोठें टिकाऊ आहेत? साऱ्या संस्था व सारे संघ नाशिवंतच आहेत. आज आहेत, उद्यां नाहींत, हा प्रकार. म्हणून शेवटीं 'धर्मं शरणं गच्छामि' या पायरीवर येणें प्राप्त असतें. भगवान् बुद्धांची जी शिकवण ती आपल्या हृदयांत आपण उभी करतों. वैचारिक मूर्ति आपण निर्माण करतों. ध्येयाची मूर्ति बनवितों आणि त्या ध्येयाची उपासना करणारे आपण होतों. मूर्ती जातात परंतु ध्येय अमर आहे. व्यक्ती जातात, तत्त्व टिकतें. महात्माजी कराची-काँग्रेसच्या वेळेस म्हणाले, "गांधी जाईल. हीं माझीं मूठभर हाडें सहज चिरडतां येतील; परंतु ज्या तत्त्वांची मी नम्रपणें उपासना करीत आहें, तीं तत्त्वें मरणार नाहींत."

"तत्त्वाचा वंश जीव
व्यक्तीला कोण विचारी?"

अशा रीतीनें जरी आपण प्रथम व्यक्तिपूजक असलों, तरी शेवटीं ध्येयपूजक झालें पाहिजे. त्या ध्येय-भगवानालाच

" जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती "

असें आपण सदैव म्हटलें पाहिजे.

सगुणांतून निर्गुणाकडे न जाऊं तर जीवन दुबळें होईल. ज्या व्यक्ती-भोंवतीं आपण जमलों ती व्यक्ति अंतर्धान पावतांच जर त्या व्यक्तीची ध्येय-मूर्ति आपण आपल्याजवळ निर्मिली नसेल, तर आपण पंगू होऊं. सगुण व निर्गुण दोहोंनीं वाढ आहे. लक्ष्मण हा सगुणभक्त होता. रामचंद्र वनास जाण्यासाठीं निघाले; तेव्हां लक्ष्मण म्हणाला, "रामा, तुझ्याशिवाय एक क्षणभरहि मी जगूं शकणार नाहीं. पाण्याशिवाय मासा मरेल, तसा तुझ्याविणें मी मरेन !" परंतु अशा या सगुणोपासक लक्ष्मणाला शेवटीं रामाचा वियोग सहन करावा लागला आहे. नारद व रामचंद्र कांहीं गुप्त बोलत असतां तो तेथें जातो आणि त्याचें शासन म्हणून रामापासून त्याला दूर जावें लागतें. निर्गुणाचा अनुभव घेणें त्याला प्राप्त झालें. भरत हा जणुं निर्गुणोपासक. प्रत्यक्ष रामचंद्र जरी जवळ नसले, तरी त्यांचें ध्यान करीत तो नंदीग्रामीं बारा वर्षें राहिला; परंतु पंचवटींतून रामांना भेटून परत जातांना त्यांच्या पादुका तरी तो घेऊन गेला. तेवढा आधार त्याला हवा होता. सगुणाचा तेवढा ओलावा त्याला आवश्यक वाटला.

पुष्कळ वेळां असें वाटतें, कीं सगुणाची पराकाष्ठा म्हणजेच निर्गुण. सर्वत्रच प्रभुरूप दिसूं लागलें कीं शेवटीं डोळे मिटून आपण शांत बसूं. जणुं निर्गुणो-पासक बनूं. सगुणोपासक असा शांत बसत नाहीं. तो समाजांत सर्वत्र वावरतो. तो कर्मयोगी होतो. सगुणरूपाची सेवा करायला तो धांवतो. विश्वरूपाचा हव्यास दूर करून या दोन हातीं छोट्या परमेश्वराच्या सेवेस तो उभा राहतो आणि अशी सेवा करतां करतां तो उत्तरोत्तर अधिकाधिक निर्मळ होतो. केवळ ज्ञानरूप होतो. बाराव्या अध्यायांतील भक्तांचीं लक्षणें वाचा. सगुण ब्रह्माची उपासना करतां करतां, या आजुबाजूच्या परमेश्वराची कर्ममय पूजा करतां करतां तीं लक्षणें त्याच्या अंगीं येतात. तो प्रेममय होतो. केवळ निरहंकारी. कोणाला उगीच दुखवणार नाहीं. कोणाला कंटाळणार नाहीं. सदैव हातांत सेवा, डोळ्यांत प्रेम. असा तो सगुणभक्त म्हणजे सर्वांचा आधार होतो. सर्वांचा प्राण बनतो.

कधीं क्षणभर एकान्तांत बसून निर्गुणांत बुडावें, पुन्हां सगुणाची गोडी चाखण्यासाठीं संसारांत सेवा करीत रहावें आणि हा द्विविध आनंद लुटावा. दोहोंनीं जीवन परिपूर्ण करावें.

• • •

# अध्याय १३ वा

तेराव्या अध्यायापासून पुन्हां एक निराळें दालन उघडण्यांत आलें आहे. सहाव्या अध्यायाच्या अखेरीपर्यंत कर्माचा ऊहापोह होता. बाराव्या अध्यायाच्या समाप्तीपर्यंत भक्तीचा प्रपंच होता. तेराव्यापासून तों पंधराव्याच्या समाप्तिपर्यंत ज्ञानाचा विचार आहे.

ज्ञान म्हणजे काय ? ज्ञान म्हणजे सद्गुण.

" अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् "

इत्यादि गुणांची यादी भगवंत देतात व शेवटीं म्हणतात :

" एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा "

हे गुण म्हणजेच ज्ञान. ज्ञान म्हणजे पांडित्य नव्हे. ज्ञान म्हणजे पुस्तकी विद्या नव्हे. आपणांस हें शरीर मिळालें आहे. हें देवाघरचें शेत. बाहेरचें शेतभात मिळेल तेव्हां मिळेल ; परंतु हें साडेतीन हातांचें शेत तर प्रत्येकास मिळालेलें आहे. बाहेरच्या शेतींत ज्याप्रमाणें आपण धान्य पिकवितों, त्याप्रमाणें या जीवनाच्या शेतींत आपणांस सद्गुणांचें पीक घ्यावयाचें आहे.

भगवान् बुद्ध एकदां भिक्षा मागत एका श्रीमंत शेतकऱ्याच्या अंगणांत येऊन उभे राहिले. त्यांनीं आपलें भिक्षापात्र पुढें केलें. तो शेतकरी म्हणाला, " अशी भीक कशाला मागतां ? माझ्यासारखे शेतकरी व्हा. ही पहा सोन्यासारख्या धान्याची येथें रास पडली आहे." भगवान् बुद्ध म्हणाले, " गड्या, मीसुद्धां एक शेतकरीच आहें."

" काय, तुम्ही शेतकरी आहांत ? कोठें आहे तुमचें शेत ? कोठें आहे नांगर ? कोठें आहेत बैल ? कोणतें पीक घेतां ? "

" माझें हृदय हें माझें शेत. तेथें विवेकाचा नांगर जोडतों. सारें वासनाविकारांचें रानगवत काढतों. प्रेमाचें, सत्य-अहिंसेचें अपरंपार पीक घेतों."

अशी ही देवाघरची शेती आपणांस करावयाची आहे. देहाच्या या साधनानें हे सद्‌गुण अंगीं आणावयाचे आहेत. तो प्रसिद्ध तत्त्वज्ञानी कार्लाइल एके ठिकाणीं म्हणतो, " माणसें हीं गिधाडासारखीं आहेत. जरा कांहीं करतांच त्यांना फळ हवें असतें. मोबदला हवा असतो; परंतु ईश्वरानें हा देह आधींच दिला आहे. बुद्धि दिली आहे. हृदय दिलें आहे. या ज्या अमोल देणग्या आधींच मिळाल्या आहेत, त्यांबद्दल कृतज्ञ राहून आपण सदैव सेवा केली पाहिजे. कांटा दिसला तर दूर करावा. दगड दिसला बाजूला फेकावा. जेथें ओसाड, उजाड असेल तेथें हिरवें हिरवें करावें. प्रभूनें जें आधींच दिलें आहे त्याचें उतराई म्हणून आपण सत्कर्मे करीत राहणें हेंच आपणांस शोभतें."

परंतु हे सद्‌गुण एकाएकीं येतील असें नाहीं. एकेक गुण अंगीं यावा म्हणून बुद्धदेवांनीं शेंकडों जन्म घेतले. आपल्या अंतःकरणांत प्रभूचा सूर असतो. " बाबा रे, हें कर, हें चांगलें आहे. तें वाईट आहे. तें नको करूं." असें कोणी तरी अंतर्यामीं आंतून हळूच सांगत असतो; परंतु ती मंजुळ वाणी आपणांस जणुं ऐकूं येत नाहीं. तो अंतर्यामी लादणारा नसतो. तो मारून-मुटकून करायला लावणार नाहीं. तो हळूच सांगेल. ऐकलेंत तर बरें; नाहीं तर आशेनें वाट पहात राहील.

परमेश्वरासारखा आशावान् कोण आहे ? हजारों वर्षे मानवाला जन्मून झालीं. तरी अद्याप तो माकडासारखा वागत आहे ! वृकव्याघ्रांप्रमाणें रक्तपिपासु आहे. आईबापांचा एकादा मुलगा जरा बिघडला तरी त्यांना दुःख होतें; मग ज्या प्रभूचीं कोट्यवधि लेंकरें आज हजारों वर्षे बिघडत आहेत त्या प्रभूनें किती निराश व्हावें ? बर्नार्ड शॉ या विख्यात इंग्रज नाटककारानें एके ठिकाणीं लिहिलें आहे, " मानवाला निर्माण करण्याचा आपला प्रयोग फसला असें समजून ही सारी मानवजात प्रभु एके दिवशीं पुसून टाकील ! " आपणांस निराशेनें असें वाटलें तरी प्रभूला तसें वाटत नाहीं. त्याची अमर आशा आहे, त्याचें प्रेम कमी नाहीं झालें. त्याचे तारे, त्याचे वारे, त्याचे मेघ, त्याचीं फुलें, फळें, सारें आपणांसाठीं सदैव उभें आहे.

मनुष्याचें प्रेम गुलाम करतें. आईबाप मुलाला प्रेमानें वाढवतात; परंतु त्यांच्या मताप्रमाणें मुलगा न वागला तर त्यांना वाईट वाटतें. " तुला एवढ्यासाठीं वाढवलें का ? " असें तीं विचारतात. परमेश्वर कधीं विचारीत

नाहीं. तो अनंत हस्तें देत आहे. एक दिवस हा मानवप्राणी माझ्याकडे येईल अशी त्याला अनंत आशा आहे.

तेराव्या अध्यायांत पुढील श्लोक आहे :

" उपद्रष्टाऽनुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः "

प्रभु प्रथम उपद्रष्टा असतो. तो जवळ उभा राहून तुमच्याकडे पाहतो. बोलत नाहीं. तुमचें केव्हां तरी लक्ष वेधेल या आशेनें तो असतो. कधीं हळूच बोलला तरी तें आपणांस ऐकूं येत नाहीं; परंतु जगांतील अनुभवानें आपण जरा अंतर्मुख होतों. जीवन चांगलें जगावें असें मनांत येऊं लागतें. जीवनांत विवेक येतो. असें करावें, असा निश्चय करावा, आजपासून हें ध्येय, असे बेत आपण करूं लागतों. त्या अंतर्यामीला आनंद होतो. तो हळूच होकार देतो. अनुमति देतो. " बाळ, असाच वाग हो. चांगला आहे तुझा निश्चय. तो टिको." असें तो उपद्रष्टा म्हणतो. उपद्रष्टा आतां केवळ दुरून बघणारा न राहतां जवळ येतो. पाठीवर शाबासकी देतो. तो अनुमंता होतो. पुढें आपण धडपडत जातों. संकटांत आधार कोठून मिळतो? अंधारात प्रकाश येतो. वाटतें, कीं प्रभूच साहाय्य देऊन राहिला आहे. तोच भर्ता, तोच आधार. त्या अंतर्यामीविषयीं अपरंपार भक्तिप्रेम वाटतें. सारा अहंकार गळतो आणि आपण म्हणतों, "देवा, तुझाच आधार आहे. तूंच प्रकाश दिलास. तूंच सांभाळलेंस. तूंच माझें तारण केलेंस. माझ्या हातून जें कांहीं झालें असेल, तें तुझ्या कृपेचें फळ. जें कांहीं माझ्या हातून झालें असेल, तें तूंच घे. तूंच त्याचा भोक्ता हो. या चराचराचा चालक तूं. तूं महेश्वर. तूं माझ्या हृदयांत बसून मला हळूहळू सन्मार्गावर आणलेंस. तुझी ही कृपा."

असे शब्द आपल्या तोंडून बाहेर पडतात. वृत्ति निरहंकार होते आणि जीवनाच्या शेतांत आपण सद्गुणांचें पीक घेऊं लागतों. एक गुण आला कीं त्याच्या ओढीनें दुसरा येतो आणि ही सद्गुणसंपत्ति वाढूं लागते. जीवनांत ज्ञानाची प्रभा फांकते. कर्में सुंदर व निर्मळ होऊं लागतात. जीवनाचें हेंच साफल्य. जन्माला येऊन दुसरें काय मिळवायचें?

● ● ●

# अध्याय १४ वा

तेराव्या अध्यायांत सद्गुण-शेती करावी असें भगवंतांनीं सांगितलें. हे सद्गुण म्हणजेच ज्ञान, अशी ज्ञानाची व्याख्या केली; परंतु या चौदाव्या अध्यायांत आणखी अधिक फोड केली आहे. अधिक खुलासा केला आहे.

या जगांत सर्वत्र सत्त्व, रज व तम या तीन गुणांचा पसारा आहे. आपण या तीन गुणांच्या पाशांत जखडलेले असतों. ही त्रिगुणात्मक माया आपणांस अंतर्बाह्य वेढून आहे. या मायेचे पाश कसे तोडावयाचे? या बंधनांतून कसें मोकळें व्हायचें?

या तीन गुणांतील तमोगुण जो आहे तो अजिबात नष्ट केला पाहिजे. तमोगुण म्हणजे आलस्य. तमोगुण म्हणजे अनवधानता. आपल्या देशांत या तमोगुणाचें साम्राज्य फार. एकादी गोष्ट करण्याचें कबूल करतात आणि खुशाल विसरलों म्हणतात! हा विस्मृतीचा जो रोग आहे, तो तमोगुणांतून जन्मतो. विसरणें हा मनाचा आळस आहे. महात्माजींनीं मॉडर्न रिव्ह्यूसाठीं लेख लिहावयाचें एकदां कबूल केलें होतें. १९३० सालची ती अमर दांडीयात्रा सुरू झाली होती. महात्माजींना क्षणाची उसंत नव्हती. रोज त्यांना लेख लिहायची आठवण होई. ते म्हणायचे, "लेख लिहायचें राहिलें." शेवटीं एकदां त्यांनीं वेळ काढून तो लेख लिहिला. या लेखाची गंमत अशी झाली, कीं तो चुकून केराच्या टोपलींत गेला! मॉडर्न रिव्ह्यूच्या संपादकांचें पुन्हां पत्र आलें, "लेख पाठवा." महात्माजींचें उत्तर गेलें कीं, "लेख कधींच पाठवला." मग तिकडे शोधूं लागले. शेवटीं तो छोटा लेख सांपडला.

महात्माजी असे दक्ष असतात. बेळगांव-कॉंग्रेसच्या वेळेस तेथेंच राष्ट्रीय शिक्षणपरिषदहि भरली होती. महात्माजी तेथें होते. एक ठराव वाचून दाखविण्यांत आला. तेथें जमलेल्या प्रतिनिधींपैकीं एक तरुण असे प्रतिनिधि म्हणाले, "माझें जरा लक्ष नव्हतें. ठराव फिरून वाचून दाखवावा." त्याबरोबर महात्माजी म्हणाले, "तुम्हीं अधिक लक्ष दिलें पाहिजे होतें."

सावधानता, दक्षता, नीट काळजीपूर्वक काम करणें, हें सारें सत्त्वगुणांत येतें. विनोबाजी एकदां म्हणाले, "महात्माजींनीं हिंदु-मुस्लीम ऐक्यासाठीं दिल्लीस २१ दिवसांचा उपवास केला. त्या वेळेस तेथें सर्वधर्मपरिषद् भरली

होती. सकाळची ९ वाजतांची वेळ होती; परंतु ९ वाजतां मंडपांत फक्त दोनच माणसें होतीं! ॲनी बेझंट व मी." आपणांस कसें तरी गबाळ्यासारखें वागण्याची संवय लागली आहे. बावळटपणा म्हणजे साधुता नव्हे. एका पैची चूक पडत होती तर एकनाथ रात्रभर बसले. आळस हा भयंकर शत्रु आहे.

" आळस उदास नागवणा "

असें समर्थांनीं म्हटलें. आळसामुळें साऱ्या जीवनाची माती होते. आळस, निद्रा, अनवधानता, भीति इत्यादि सारे तमोगुणाचेच प्रकार. ज्याला मोक्षार्थी व्हायचें आहे, त्यानें तमोगुण जिंकून घेतला पाहिजे. तमोगुण साफ दूर केला पाहिजे.

आणि रजोगुण म्हणजे काय? रजोगुण म्हणजे सुखोपभोगासाठीं धांवपळ. कुंभकर्ण झोंपून रहावयाचा, तर रावण सारखा साम्राज्य वाढवीत रहायचा! एक मूर्तिमंत तमोगुण, तर दुसरा मूर्तिमंत रजोगुण! रजोगुण म्हणजे वायफळ हालचाल. उगीच वटवट करणें, उगीच आदळआपट. ज्या गोष्टींचा जीवनाच्या विकासासाठीं संबंध नाहीं अशा फालतु गोष्टी करीत बसणें. आपण आपली किती तरी शक्ति वायां दवडीत असतों. वास्तविक ही सारी शक्ति ध्येयार्थ खर्च केली पाहिजे. ज्याप्रमाणें सूर्याचे किरण भिंगावर एकत्र पाडले तर त्यांतून ठिणगी पडते, त्याप्रमाणें आपल्या सर्व शक्तींचा झोत आपल्या ध्येयावर सोडला पाहिजे; परंतु आपण शक्ति फुकट दवडीत असतों. गप्पाच मारूं; खाण्याच्याच चर्चा करूं; सिनेमा-बोलपटांतच केवळ रंगूं; नाना प्रकारचे, नाना रंगांचे कपडेच करीत बसूं; केसच कुरवाळीत बसूं; बायका कानांना वा नाकांना भोंकें पाडतील. नाकांत चमक्या बसवतील. कानांत मोतीं घालतील. या देहांतच अलंकार ठेवण्यासाठीं पेट्या जणुं तयार करतात! या सर्वांचा काय उपयोग? यानें जीवन समृद्ध होतें का? मनाचा, हृदयाचा विकास होतो का?

कोणी विमानांत बसून पक्षी होऊं पाहतो. कोणी पाणबुडींत बसून मासा होऊं पाहतो. माणसाच्या आकारांत राहून पशुपक्षी होण्याचे डोहाळे जणुं त्याला होऊं लागतात! हे सारे सोस कशासाठीं? याचा अर्थ विमानांचा शोध लागूं नये असें नाहीं. दुष्काळी भागांत धान्य पाठविण्यासाठीं विमानें आणा; त्या त्या गोष्टींनीं जीवनांत सुंदरता, शिवता आणतां येईल तर ती हवी आहे; परंतु उगीच फापटपसारा काय कामाचा?

समाजोपयोगी कर्में करतां यावींत म्हणून देहाची जोपासना केली पाहिजे. अन्नवस्त्रादि आवश्यक गरजा भागल्याच पाहिजेत; परंतु ज्या गोष्टींनीं आपण उन्नत न होतां कदाचित् घसरण्याचाच संभव, त्या कशाला करा? खातच बसले, खेळतच बसले, चिरूटच ओढीत राहिले, पानसुपारीचे बारच भरीत राहिले, सारखे गातच बसले, सारखे खो खो हंसतच राहिले, सारखे नट्टा-पट्टाच करीत राहिले, सारखे भांडतच बसले, सारखी काटाकाटी, छाटाछाटी! असलें हें जीवन भेसूर आहे. तमोगुणी जीवनामुळें आपण दगड होऊन पडतों, तर रजोगुणी जीवनामुळें कधीं फुलपांखरें तर कधीं वृकव्याघ्र असे आपण होतों. केवळ शारीरिक सुखोपभोगाचा हव्यास धराल तर फसाल, मराल, नष्ट व्हाल.

सेवेचीं उदंड कर्में पडलीं आहेत. राष्ट्राच्या उभारणीचीं अनंत कामें आहेत. महात्माजी नाना प्रकारची सेवा करण्यासाठीं तुम्हांला बोलावीत आहेत. ख्रिस्त एकदां म्हणाला, "अरे, कोळी मासे पकडतो; परंतु मी माणसांना पकडतों. त्यांना वेड लावतों. त्यांना नवीन नादास लावतों." तसे महात्माजी माणसें पकडण्यासाठीं उभे आहेत. या ना त्या नात्यानें ते तुम्हांला राष्ट्रकार्याकडे खेंचून घेऊं पहात आहेत. "खादी नसेल पसंत तर गोसेवा उचला, नाहीं तर राष्ट्रभाषाप्रचार घ्या, ग्रामोद्योग घ्या, मधुसंवर्धन-विद्या घ्या, हरिजनसेवा उचला, हिंदु-मुस्लीम प्रश्न घ्या, स्वच्छता करा, आरोग्य निर्मा, व्यायामशाळा काढा, कोठलें तरी कार्य घ्या!" असें जणुं तो महापुरुष सांगत आहे. सारीं कर्मक्षेत्रें दाखवीत आहे. या राष्ट्रोद्योगांच्या जाळ्यांत तुम्हांस पकडूं पहात आहे; परंतु तुमचा-आमचा वेळ वायां जात आहे. जीवन हें कर्तव्यासाठीं आहे. आयुष्य ही प्रभूची ठेव. साऱ्या आयुष्याचा झाडा द्यावा लागेल. आपण आपल्या शारीरिक, मानसिक, बौद्धिक शक्तींचा व्यय कसा केला, कशांत केला, याचा हिशेब द्यावा लागेल. येईल का तो देतां?

जीवन हें परम पुरुषार्थासाठीं आहे. परम पुरुषार्थ प्राप्त करून घेण्यासाठीं आपण आपली सारी शक्ति इतरत्र न खर्चितां जरी ओतली, तरी ती अपुरीच पडेल. शेवटीं प्रभूला शरण जाऊन त्याची करुणा भाकावी लागते. शेवटीं प्रार्थनेचें बळ मदतीस घ्यावें लागतें. अशी जेथें परिस्थिति आहे, तेथें आपण आपली शक्ति वारेमाप क्षुद्र गोष्टींत कां खर्च करीत बसावें?

विवेकानंद जर वायफळ गोष्टी करीत बसले तर श्रीरामकृष्ण परमहंस रागवावयाचे व म्हणायचे, "तूंहि कां क्षुद्र काथ्याकूट करीत बसलास?" विवेकानंदांनीं सर्व शक्तीचा संचय केला. ब्रह्मचारी राहिले. त्यांना अगम्य असें कांहीं नसे. एकदां जर्मन पंडित डायसन यांकडे ते गेले होते. तेथें एक पुस्तक होतें. विवेकानंदांनीं तें भराभरा सारें चाळलें. पुढें डायसनजवळ बोलतांना त्या पुस्तकांतील उतारे ते देऊं लागले. डायसन चकित झाला. त्यानें विचारलें, "हें पुस्तक केव्हां वाचलेंत?" विवेकानंद म्हणाले, "मघां!" "इतक्यांत कसें वाचून झालें?" "मी परिच्छेदच्या परिच्छेद वाचतों." विवेकानंद पॅरिग्राफच्या पॅरिग्राफ वाचीत. लहान मूल एकेक अक्षर वाचतें. आपल्या डोळ्यांत सबंध ओळ एकदम भरते; परंतु विवेकानंदांचे डोळे सारा परिच्छेद एकदम वांचीत. ही शक्ति कोठून आली? मनाच्या एकाग्रतेंतून. ब्रह्मचर्यांतून. त्यांनीं आपल्या शक्तीचा प्रचंड संचय करून ठेवला होता.

लोकमान्यांवर किती संकटें, किती कारागृहवास! डॉ. भांडारकर एकदां म्हणाले, "लोकमान्यांवर संकटें आलीं तशीं माझ्यावर आलीं असतीं, तर मी केव्हांच चिरडून गेलों असतों." लोकमान्यांना ही शक्ति कोठून मिळाली? त्यांच्या संयमांतून. एक स्त्री अर्ज लिहून घेण्यासाठीं त्यांच्याकडे आली; परंतु वर मान करून त्यांनीं तिच्या मुखाकडे पाहिलें नाहीं. म्हणून नेव्हिन्सन या पत्रपंडितानें लिहिलें आहे, "लोकमान्यांच्या डोळ्यांत जशी चमक होती, तशी मीं कोणाच्याहि डोळ्यांत पाहिली नाहीं." हें तेज कोठून आलें? फाल्तु पसाऱ्यांत, सुखोपभोगांत त्यांनीं आपली शक्ति दवडली नाहीं.

महात्माजींनीं वयाच्या छत्तिसाव्या वर्षापासून ब्रह्मचर्य पाळलें आहे. त्याच्या आधींपासूनच त्यांची धडपड सुरू होती. एकदां सीलोनमध्यें महात्माजी गेले होते. बरोबर कै. कस्तुरबा होत्या. ओळख करून देणारा सभेत म्हणाला, "आज महात्मा गांधी आले आहेत. बरोबर त्यांच्या 'मातुःश्री' कस्तुरबा आहेत." पुढें भाषण करतांना महात्माजी म्हणाले, "माझी ओळख करून देणारे मित्र थोडे चुकले. कस्तुरबा माझ्या पत्नी आहेत; परंतु एवढें खरें, कीं आज कित्येक वर्षें मी त्यांच्याकडे माता या दृष्टीनें पहात आलों आहें." महात्माजी एवढ्या म्हातारपणीं राष्ट्राचा प्रचंड बोजा कोणत्या शक्तीच्या जोरावर उचलतात तें लक्षांत आणा.

रजोगुणांत बुडाल तर ध्येयासाठीं शक्ति उरणार नाहीं. म्हणून हा रजोगुण जिंकून घ्या. वासना-विकारांचे वेग आंवरा. सर्वत्र गुराप्रमाणें धांवूं पाहणारें उल्लू मन, त्याला आंवरा आणि सत्त्वगुणाकडे सारें लक्ष द्या.

परंतु सत्त्वगुणहि जिंकून घ्यायला हवा. तमोगुण व रजोगुण संपूर्णपणें नष्टच करावयाचे. सत्त्वगुणाचें तसें नाहीं करावयाचें. कैद्याला कमरेखालीं गोळी घालून घायाळ करण्याचा अधिकार जसा पोलिसास असतो, त्याप्रमाणें सत्त्वगुणास घायाळ करावयाचें म्हणजे काय? याचा अर्थ एवढाच, कीं सत्त्व-गुणाचा अहंकार होऊं द्यायचा नाहीं. सात्त्विक क्रियांची तर समाजासाठीं, स्वतःसाठीं सदैव जरुरी; परंतु त्या सात्त्विक क्रिया हातून सहज होतील असें करावयाचें. आपलें नाक रात्रंदिवस श्वासोच्छ्वास करीत असतें. त्याचें का आपण कौतुक करतों? त्याचे का आभार मानतों? श्वासोच्छ्वास करणें हा नाकाचा सहजधर्म. शाळा सुटली कीं मुलें आपोआप घराकडे वळतात. त्यांच्या पायांचा तो सहजधर्म झालेला असतो. अंधार दूर करणें हा सूर्याचा सहजधर्म. तो म्हणेल मी अंधार दूर नको करूं, तर का मरूं? अशाप्रमाणें सत्कार्य हा सहजधर्म झाला पाहिजे; म्हणजे मग त्याचा अहंकार वाटणार नाहीं. दुसऱ्याची सेवा करावयास संत सहज धांवतात. त्यांना त्यांत आपण विशेष कांहीं करतों असें वाटत नाहीं.

सत्त्वगुण जिंकून घेणें म्हणजे त्याचा अहंकार जिंकावयाचा. अशा प्रकारें सत्ता स्थापावयाची. त्रिगुणातीत व्हावयाचें. चौदाव्या अध्यायाच्या शेवटीं त्रिगुणातीताचीं लक्षणें दिलीं आहेत. दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं स्थितप्रज्ञाचीं लक्षणें; बाराव्या अध्यायांत भक्ताचीं लक्षणें; येथें चौदाव्यांत त्रिगुणातीताचीं लक्षणें. हीं सारीं लक्षणें एकच आहेत. याचा अर्थ जो कर्मयोगी आहे, जो भक्त आहे, जो ज्ञानी आहे, ते सारे एकच आहेत. कर्म, भक्ति, ज्ञान हीं जणुं निराळीं नाहींत.

दत्तात्रेय म्हणजे मूर्तिमंत ज्ञान; परंतु दत्तांचा जन्म कोणापासून? अत्रि व अनसूया यांच्यापासून ज्ञानस्वरूपी सद्गुरु दत्तात्रेय यांचा जन्म होतो. अत्रि म्हणजे त्रिगुणातीत भाव व अनसूया म्हणजे निर्मत्सर वृत्ति; यांच्या-पासूनच ज्ञानाचा जन्म होणार.

त्रिगुणातीत होणें म्हणजे देहभाव गळणें. नारळाच्या आंत गोटा जसा

गुडगुड वाजतो, त्याप्रमाणें या देहाच्या आसक्तीपासून आत्मा संपूर्णपणें अलग करणें. ख्रिस्ताला क्रॉसवर देत होते. ख्रिस्त म्हणाले, "देवा, कां रे हा छळ ?" परंतु पुन्हां म्हणाले, "तुझी इच्छा प्रमाण !" अशा रीतीनें देहाची आसक्ति जिंकून घ्यावी लागते. त्रिगुणातीत होऊन प्रभूच्या हातांतील एक साधन म्हणून रहावयाचें. असें हें महान् ध्येय आहे. हा परम पुरुषार्थ प्राप्त करून घ्यावयाचा आहे. त्यासाठीं अविरत परिश्रम करूं या.

● ● ●

# अध्याय १५ वा

पंधराव्या अध्यायाला 'पुरुषोत्तम' म्हणतात. हा अध्याय अत्यन्त पवित्र मानला जातो. त्याचा रोज पाठ करतात. या अध्यायाला एवढें पावित्र्य कां ? कारण जीवनाचें संपूर्ण शास्त्र येथें सांगितलें आहे.

या अध्यायांत तीन पुरुष सांगितले आहेत :

१ क्षरसृष्टि हा एक पुरुष.

२ शरीरांत वावरणारा जीव हा दुसरा पुरुष.

३ आणि या दोन्ही पुरुषांना व्यापून असणारा तो तिसरा पुरुष—पुरुषोत्तम.

क्षरसृष्टि म्हणजे ही नाशिवंत सृष्टि, बदलणारी सृष्टि. नवीन नवीन रूपें धारण करणारी सृष्टि. क्षरता हें सृष्टीचें दूषण नसून जणुं भूषण आहे. सदैव बदलतें तेंच सनातन. "सनातनो नित्य नूतनः" या क्षरसृष्टींतून सेवेचीं साधनें आपणांस मिळत असतात. म्हणून ही क्षरसृष्टि पवित्र मानावयाची. तिलाहि पुरुष म्हणजे जणुं चैतन्यमय मानावयाचें. रोज तींच तींच फुलें असतीं, तर भक्ताला पूजेचा आल्हाद वाटला नसता. म्हणून निरनिराळ्या ऋतूंत निरनिराळीं पुष्पं. कधीं बकुळीचीं फुलें, तर कधीं पारिजातकाचीं; कधीं कमळें फुललीं आहेत, तर कधीं गुलाब-मोगरे. क्षरसृष्टीचें हें असें भाग्य आहे. सदैव पौर्णिमाच असती तर आपण कंटाळलों असतों; परंतु कधीं बीजेची सुंदर चंद्रकोर असते, कधीं अष्टमीचा चंद्र. कधीं पौर्णिमा, तर कधीं अमावास्या. पौर्णिमेला चंद्राचें संपूर्ण साम्राज्य, तर अमावास्येला ताऱ्यांना संपूर्ण स्वातंत्र्य. चंद्राची ही क्षरता आनंददायक आहे.

कधीं झिमझिम पाऊस पडत आहे, कधीं मुसळधार पाऊस. नद्यानाले भरले आहेत. खळखळाट पाणी वहात आहे. कधीं सुंदर ऊन, कधीं गुलाबी थंडी. कधीं वादळ होऊन सारी सृष्टि जणुं नाचूं लागते, तर कधीं केवळ शांत असते. अशी ही सृष्टीची मौज आहे. क्षरतेमुळें हें वैचित्र्यवैभव आहे.

समाज बदलतो आहे. साधनें बदलत आहेत. जुनीं साधनें गेलीं. नवीन आलीं. बैलगाड्या कमी झाल्या, मोटारी झाल्या. सेवेचीं साधनें बदललीं तरी सेवा करायचीच आहे. आपलें शरीरहि बदलतें. लहान होतें तें हें शरीर मोठें झालें. सात वर्षांत शरीरांतील सारे अणूपरमाणू म्हणे बदलतात. म्हणून शरीर सतेज राहतें. सेवा करतां येते.

क्षरसृष्टि म्हणजे सेवेचीं साधनें. या क्षरसृष्टीला पुरुष माना. तिला तुच्छ नका मानूं. तिला पवित्र माना म्हणजे काय? चरखा माझ्या सेवेचें साधन आहे. त्याला मी नीट माळ घालीन. तेल देईन. हें सेवेचें साधन स्वच्छ ठेवीन. त्याची उपेक्षा करणार नाहीं. मोटार माझ्या सेवेचें साधन. मोटारीनें मी लोकांना नेतों. ही मोटार नीट ठेवीन. टायर नीट आहेत कीं नाहींत तें पाहीन. पेट्रोल आहे कीं नाहीं पाहीन. नाहीं तर उतारूंचे हाल होतील. ते उतारू म्हणजे माझा भगवान्. त्यांची सेवा करण्याचें साधन म्हणजे ही माझी मोटार नीट ठेवूं दे. हा नांगर माझ्या सेवेचें साधन. हें जातें, ही केरसुणी, ही चूल, हें पुस्तक सारीं त्यांचीं त्यांचीं सेवेचीं साधनें. हीं साधनें आपण पवित्र मानतों. तीं नीट ठेवतों. अर्जुनाची प्रतिज्ञा होती कीं "समाजाचें रक्षण करणारें जें माझें गांडीव धनुष्य त्याची कोणी निंदा करील, तर ती मी सहन करणार नाहीं!" अर्जुनाच्या सेवेचें तें साधन होतें. बायका चुलीला, केरसुणीला, जात्याला पाय लावूं देणार नाहींत. मुलाचा पाय लागला तर नमस्कार कर म्हणतील. पंडित आपल्या पुस्तकांना पाय लावूं देणार नाहीं. दसरा आला तर शेतकरी नांगराची पूजा करील; शिंपी शिवण्याच्या यंत्राला झेंडूच्या माळा घालील; मोटारवाला मोटार सजवील. या सर्वांचा अर्थ काय? याचा अर्थ इतकाच कीं ही क्षरसृष्टि, हीं सारीं साधनें पवित्र आहेत. पुरुषमय आहेत. जणुं चैतन्यमय आहेत.

क्षरसृष्टि म्हणजे पुरुष आणि या क्षरसृष्टींत वावरणारा हा अ-क्षर जीव हाहि पुरुषच. हा अक्षर जीव मागील जन्मीं होता, या जन्मीं आहे, पुढील जन्मींहि

उभा असेल. सेवा करतां करतां दमणार नाहीं. तुकाराममहाराज म्हणतात, " सुखें घालावें जन्मासीं." पुन्हां पुन्हां सृष्टींत जन्मून सेवा करण्यासाठीं हा जीव उभा असतो. क्षरसृष्टींतील विपुल, विविध साधनें पाहून त्याला आनंद वाटतो.

क्षरसृष्टि म्हणजे पुरुष. अक्षर जीव म्हणजे पुरुष आणि या सर्वांना व्यापून असणारा तो पुरुषोत्तम. सारें विश्व जणुं पुरुषमय, सारें चैतन्यमय. सर्वत्र एकच पावित्र्य. सर्वत्र एकच सुगंध. सर्वत्र एकच आनंद. अमृतानुभवांत ज्ञानेश्वर म्हणतात, "लेण्यामध्यें दगडाच्या देवाची दगडाचा भक्त दगडाच्याच फुलांनीं पूजा करतो असें दिसतें. त्याप्रमाणें एकाच चैतन्याचे क्षर, अक्षर, पुरुषोत्तम हे सारे प्रकार."

सर्वत्र हें असें धन्य दर्शन होणें याहून पवित्रतम काय ? तुकाराममहाराज म्हणतात :

" ऐसें भाग्य कईं लाहता होईन
अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥
मग तया सुखा अंत नाहीं पार
आनंदें सागर हेलावती ॥ "

अशी ती परमदशा आहे. " वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें " असें होतें. सर्वत्र आपणच भरून राहिलों आहोंत असा अनुभव येतो. डोळ्यांतून आनंदाश्रू घळघळतात. अंगावर रोमांच उभे राहतात.

याहून अधिक थोर विचार तो कोणता ? याहून अधिक उदात्त तत्त्वज्ञान तें कोणतें ? येथें परमावधि झाली. पंधराव्या अध्यायाच्या शेवटीं म्हणून भगवान् म्हणतात :

" इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ "

हें सारें गुह्यतम असें शास्त्र तुला सांगितलें. गीताशास्त्र जणुं येथें संपलें.

पंधरावा अध्याय कर्म, भक्ति, ज्ञान यांची एकरूपता सांगत आहे. कर्माचीं साधनें, जीव, परमात्मा सारें पुरुषमय ; सारें परमैक्य. कर्म, शक्ति, ज्ञान हीं निराळीं नाहींत. कर्म म्हणजेच भक्ति, भक्ति म्हणजेच ज्ञान, ज्ञान म्हणजेच कर्म. सारीं एकमेकांत मिसळावयाचीं. खऱ्या कर्मांत भक्ति व ज्ञान

असणारच. खऱ्या भक्तींत कर्म व ज्ञान असणारच. खऱ्या ज्ञानांत कर्म व भक्ति हीं येणारच. या वस्तू एकरूपच आहेत. फुलाच्या पांकळी-पांकळींत गंध व रंग अविनाभावें असतात. त्याप्रमाणें आपल्या कर्मांत भक्ति व ज्ञान यांचा रंग व गंध भरलेला हवा. भक्तींत कर्म व ज्ञान यांचा गंध व रंग हवा. ज्ञानांत कर्म व भक्ति यांचा रंग व गंध हवा. दुधांत ज्याप्रमाणें साखर व केशर आपण घालतों, त्याप्रमाणें आपण कर्म, भक्ति व ज्ञान हीं एकरूप करूं या.

असें हें गीताशास्त्र आहे. हा धन्यतम पुरुषोत्तमयोग आहे.

● ● ●

# अध्याय १६ वा

पंधराव्या अध्यायाच्या शेवटीं गीताशास्त्र सांगितलें असा उल्लेख आहे. सोळावा व सतरावा अध्याय हे परिशिष्टरूप आहेत. अठरावा अध्याय म्हणजे उपसंहार आहे.

या सोळाव्या अध्यायांत दैवी व आसुरी संपत्तींचें वर्णन आहे. जगाच्या आरंभापासून निरनिराळ्या स्वरूपांत हा झगडा चाललेला आहे. सर्व धर्मांतून हें द्वैत सांगितलें आहे. ख्रिश्चन धर्मांत सैतान व परमेश्वर यांचा अखंड झगडा आहे. पारशी धर्मांत तेंच आहे. येथें गीता तेंच सांगते आहे. या सदसतांच्या झगड्यांत आपण कोणत्या बाजूनें उभे राहणार हा प्रश्न आहे. अशा झगड्यांतूनच जगाची प्रगति होत आली आहे. विरोधांतून विकास होत आहे. पाऊल पुढें पडत आहे.

दैवी गुणांच्या आरंभींच अभय या गुणाला स्थान दिलें आहे आणि शेवटीं नम्रता, नातिमानिता हा गुण सांगितला आहे. अभयाशिवाय प्रगति नाहीं; परंतु नम्रताहि हवी. सायकलला जसा ब्रेक असतो तसा नम्रतेचा ब्रेक हवा, म्हणजे नीट पाऊल पुढें पडेल.

निर्भय वृत्तीनें पुढें झाल्याशिवाय विकासाचा मार्ग मोकळा होत नाहीं. जवाहरलाल एकदां म्हणाले, " निर्भयपणें विचार करा व निर्भयपणें आचार करा." लोकमान्य उभे राहिले व म्हणाले, " स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे. तो मी मिळवणारच ! " आगरकर उभे राहिले व म्हणाले, " दुष्ट

रूढी तोडल्या पाहिजेत. स्त्रियांना शिक्षण दिलें पाहिजे." आगरकरांचा छळ झाला. त्यांची जिवंतपणीं प्रेतयात्रा काढली गेली! परंतु आगरकर खचले नाहींत. ते वीराप्रमाणें उभे राहिले. त्यांच्या विचारांचा आज विजय झाला आहे. आज महात्माजी निर्भयपणें उभे ठाकले आहेत. असे हे निर्भय पुरुष उभे राहतात व जगाला पुढें नेतात. जग आधीं तयार होत नाहीं; परंतु या ध्येयवादी व्यक्तींचा त्याग पाहून, त्यांची अचल निष्ठा पाहून, जग शेवटीं त्याच्या पाठोपाठ जातें. जगाचें पाऊल पुढें पडतें.

जगांत एकीकडे अहंकारी लोक आहेत. हें मिळवीन, तें मिळवीन; याला लुटीन, त्याला पिटीन; येथें साम्राज्य स्थापीन, त्या देशाला गुलाम करीन; आम्ही उच्च संस्कृतीचे, बाकीचे तुच्छ; मी स्पृश्य, ते दुसरे अस्पृश्य; अशा प्रकारचा राक्षसी अहंकार एकीकडे थैमान घालीत असतो. या राक्षसाशीं दोन हात करायला सत्प्रवृत्त लोक उभे राहतात. महात्माजींना एकानें प्रश्न विचारला, " जगण्यांत तुम्हांला आनंद कां वाटतो?" त्यांनीं उत्तर दिलें; " जगांतील अंधार दूर करण्यासाठीं धडपडण्यांत मला आनंद वाटतो."

जगांत कांहींची चैन चालली आहे, कोट्यवधि लोकांची दैना आहे. ही विषमता पाहून जो उठणार नाहीं, ती दूर व्हावी म्हणून बंड पुकारणार नाहीं, तो राक्षस आहे. स्वतःजवळच राखतो तो राक्षस. दुसऱ्यास देतो तो देव. कोंकणांत खोत व शेतकरी यांचे झगडे आहेत. खोताला नाना अधिकार। आधीं खोताचें गवत कापून दिलें पाहिजे. आधीं खोताचे हरडे गोळा झाले पाहिजेत. सारें जंगल खोताचें. तिकडे जमीनदारांचे असेच शेंकडों मिराशी अधिकार. यत्किंचितहि श्रम न करतां गाद्यांवर लोळणारीं हीं ऐतखाऊ बांडगुळें पाहून कोणाचें रक्त सळसळणार नाहीं? शेतकरी राबराब राबतो. परंतु त्याच्या मुलाच्या अंगावर नीट कपडा नाहीं. बायकोला नीट लुगडें नाहीं. घरांत उपासमार. ना ज्ञान, ना कला. दरिद्रनारायणाचा हा फाटका संसार कोण सुधारणार? गिरणीचे मालक, कारखानदार बंगल्यांतून रहात आहेत. मोटारी उडवीत आहेत; परंतु कामगारांची किती हीनदीन स्थिति! रहायला रद्दी जागा. पोटभर खायला नाहीं. जीवनांत आनंद नाहीं. हें कोठवर सहन करावयाचें?

समाजवादाशिवाय आतां तरणोपाय नाहीं. समाजवादाचें नांव ऐकून

घाबरण्याचें कारण नाहीं. समाजवाद म्हणजे कृतींत आणिलेलें अद्वैत; समाजवाद म्हणजे जीवनांत उतरलेला वेदान्त. गांधीवाद व समाजवाद यांचा समन्वय करतां आला तर करा. अहिंसेनें समाजवाद आला तर तो महात्माजींना नको आहे असें नाहीं. स्वर्गीय महादेवभाईंनीं एकदां लिहिलें होतें कीं, "निवडणुकीच्या कार्यक्रमांत समाजवादी योजना आंखून लोकांनीं जर तुम्हांला निवडून दिलें, तर ती योजना असेंब्लींत तुम्हीं पास करायला हरकत नाहीं."

कोणताहि मार्ग घ्या. लोकांना सुखी करा. जीवनाच्या आवश्यक गरजा सर्वांच्या भागल्या पाहिजेत. अन्नवस्त्र, ज्ञान, विश्रांति, आनंद सर्वांना मिळाली पाहिजेत. आज अशी परिस्थिति आहे कीं सर्वांना या वस्तू देतां येतील; नीट योजना मात्र हवी. संशोधनाचा मानवी सुखासाठीं उपयोग केला म्हणजे हें सारें होईल.

पंडित जवाहरलाल एकदां म्हणाले, "कोट्यवधि लोक अन्नवस्त्रास पारखे असतां, ज्ञानानंद व कलानंद यांना पारखे असतां, धर्माच्या व संस्कृतीच्या गप्पा हे लोक मारतात तरी कसे?" खरें आहे. खरा धर्म अद्याप यावयाचा आहे.

"सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात्"

असें नुसतें पुटपुटून भागणार नाहीं. हें मनोहर व मंगल दृश्य जगांत प्रत्यक्ष दिसावें म्हणून सर्वस्वार्पणबुद्धीनें झगडायला जो उभा राहील, तो खरा देवाचा लाडका. तो खरा ज्ञानी. तो खरा भक्त.

● ● ●

## अध्याय १७ वा

सतरावा अध्यायहि परिशिष्टरूप आहे. यज्ञ, दान व तप या तीन गोष्टी येथें सांगितल्या आहेत. गीतेंत यज्ञधर्माचें महान् तत्त्व आहे. गीतेंतील यज्ञ शब्दाचा अर्थ काय? यज्ञ म्हणजे झीज भरून काढणें. तिसऱ्या अध्यायांत

"सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक्"

असा सुंदर श्लोक आहे. सृष्टि निर्माण करणाऱ्यानें मनुष्याला एकटें नाहीं निर्मिलें. त्याच्याबरोबर यज्ञहि निर्माण केला. यज्ञ निर्माण करून प्रभु म्हणाला, "या यज्ञाची उपासना करा. हा यज्ञ हीच तुमची कामधेनु." त्या तिसऱ्या अध्यायांत पुढें म्हटलें आहे कीं, "तुम्ही देवांसाठीं यज्ञ करा. देव तुमच्यासाठीं पाऊस पाडतील." याचा अर्थ काय? याचा अर्थ हा, कीं एकमेकांनीं एकमेकांची झीज भरून काढावी. देव म्हणजे स्वर्गांत राहणारे. ते स्वर्गांतील देव कोठें असतील ते असोत; परंतु या भूतलावर जे मोठमोठ्या बंगल्यांतून राहतात ते देव आपण पाहातों. या देवांना शेतकरी, कामगार हविर्भाग नेऊन देतात; परंतु देवांनींहि या शेतकरी, कामगारांना भरपूर दिलें पाहिजे. थेंबथेंब भिकाऱ्यासारखें देऊं नये, तर पाऊस पाडावा. तरच शेतकऱ्या-कामकऱ्यांची झीज भरून येईल. सर्व सृष्टींत हें यज्ञतत्त्व भरून राहिलें आहे. नद्या आटतात व मेघांना सजल करतात; परंतु मेघ पुन्हां त्या कोरड्या झालेल्या नद्यांना भरून काढण्यासाठीं रिते होतात. असें हें चक्र आहे. तुझी झीज मी भरून काढतों, माझी तूं भरून काढ. रामराम असें आपण एकमेकांना म्हणतों. तूं राम व मीहि राम. 'देवो भूत्वा देवं यजेत्' तूं देव व मीहि देव. एकमेकांना सांभाळूं या. प्रेमानें देऊं या. असा हा यज्ञधर्म आहे.

शेतकरी शेतांत पीक घेतो. शेताचा कस गेला. शेताची झीज झाली. ती झीज भरून काढण्यासाठीं तो शेतकरी खत घालतो. झीज भरून काढतो. याला यज्ञ म्हणतात.

आपला देह सेवेंत श्रमला. त्याची झीज झाली. ती झीज भरून काढण्यासाठीं देहाला घांस देणें म्हणजे यज्ञकर्म आहे. तें उदरभरण नाहीं. देह सेवेंत राबला. त्याची झीज भरून येण्यासाठीं झोंप हवी. श्रमलेल्या कर्मयोग्याची ती निद्रा म्हणजे पवित्र यज्ञकर्म होय.

बायका चूल सारवून ठेवतात. मलिन भांडीं स्वच्छ करतात. उखळलेली जमीन सारवतात. घामट कपडे धुतात. हें सारें यज्ञकर्म आहे.

सृष्टींत हा यज्ञधर्म नीट चालेल तर आनंद नांदेल. आज जगांत दुःख आहे; कारण यज्ञोपासना नाहीं. इंग्लंडनें हिंदुस्थानला लुटावें व फक्त स्वतः गलेलठ्ठ व्हावें. हिंदुस्थानची झीज कशी भरून येणार? सर्वत्र हे असे अयज्ञीय प्रकार आज चालले आहेत. आपल्या देशांत आज आपणहि तेंच पाप

करीत आहेत. जमीनदार, खोत, कारखानदार, गिरणीमालक, शेतकऱ्या-कामकऱ्यांची झीज भरून यावी, त्यांना आनंद व विश्रांति मिळावी म्हणून कांहीं करीत आहेत का?

गीता सांगते, एकमेकांची झीज भरून काढा. यज्ञधर्माचे उपासक व्हा. वास्तविक यज्ञधर्म नीट आचराल तर तुमच्याजवळ संचय होणार नाहीं; परंतु संचय झालाच तर तो देऊन टाका. समजांतील विषमतेचे खळगे भरून काढण्यासाठीं तुमचे सांठे-संचय घेऊन या. वेदांतील ऋषि म्हणतो :

" मोघमन्नं विन्दते अप्रचेताः
सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य "

जो अप्रचेतस् आहे,. म्हणजे ज्याचें मन प्रगल्भ नाहीं, ज्याचें हृदय उदार नाहीं, अशाला अन्नाच्या राशी उगीच मिळाल्या. त्यानें घरांत भरून ठेवलेलीं कोठारें, तीं त्याचा प्राण घेतील.

ऋषीची ही वाणी सत्य आहे. ही गोष्ट रशियांत दिसली. सर्वत्र दिसेल. गरीब लोकांच्या सहनशक्तीला कांहीं सीमा आहे. शंकराला 'दरिद्र' व 'रुद्र' अशीं दोन्ही नांवें आहेत. हा दरिद्र मनुष्य कल्याणप्रद शिवशंकरहि आहे. तो तुम्हांला वांचवील. तो मृत्युंजय आहे; परंतु या दरिद्री मनुष्याचा जर अंतच पहाल, तर हा दरिद्र शेवटीं रुद्र होईल व तुमचें भस्म करील.

म्हणून यज्ञधर्म आचरा. जवळ सांचलें तर तें सेवेसाठीं द्या आणि तप आचरा. शारीर, मानसिक व वाणीचें तप. शरीर निर्मळ ठेवा. इंद्रियांवर ताबा ठेवा. मन पवित्र ठेवा. ज्ञान मिळवा. ब्रह्मचर्याचे उपासक बना. नवीन नवीन विचार अभ्यासा. आळस करूं नका. असें त्रिविध तप आहे. सेवा करावयास शरीर सतेज हवें. वाणी गोड हवी; विचारांची पुंजी हवी; हृदय उदार हवें. या साऱ्या गोष्टी या त्रिविध तपांत येतात. वाणीचा संयम ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. एकाद्या कठोर शब्दानें कायमची मैत्री तुटते. मतभेद असूनहि गोड बोलतां येईल. मुक्तेश्वरानें म्हटलें आहे :

" फुटल मोतीं तुटलें मन। सांधूं न शके विधाता ॥ "

फुटलेलें मोतीं सांधतां येत नाहीं. तुटलेलें मन जोडतां येत नाहीं. म्हणून जपावें. समर्थांनीं म्हटलें आहे, " बहुत असावे तणावे." ठायीं ठायीं मित्र-

मंडळें असावींत. ओळखी असाव्यात. आधार असावेत. गोड वाणीनें हें साधतें.

जगापाशीं जगमित्र । जिह्वेपाशीं असे सूत्र

हें सूत्र तुटूं नये. गोड वाणीनें सर्वांना वेड लावावें.

यज्ञ, दान, तप यांचा महिमा सांगून सतराव्या अध्यायाच्या शेवटीं भगवान् म्हणतात, "कोणतेंहि कर्म करतांना 'ॐ तत् सत्' असें म्हणत जा." याचा काय अर्थ? ॐ म्हणजे काय? उपनिषदांत सांगितलें आहे कीं सारें वाङ्मय कढवून त्यांतून ॐ हें सार काढलें. ॐ हें परमेश्वराचें नांव. यांत सारें तत्त्वज्ञान आलें. सारे धर्म आले. ॐ चा अर्थ होय असाहि आहे. देव आहे का? ॐ. होय, देव आहे. देव म्हणजे काय? देव म्हणजे पूर्णता. देव म्हणजे सर्वत्र सच्चिदानंदाचें साम्राज्य. सर्वत्र सत् म्हणजे मंगल भावना आहेत; चित् म्हणजे ज्ञान आहे. आणि जेथें हृदय मंगल आहे व बुद्धि शुद्ध आहे, तेथें आनंद दिसणार नाहीं तर कोठें? म्हणून आपण ॐ म्हणूं या. देव आहे. ती परिपूर्णता आहे. त्या देवाचें स्वरूप कसें आहे? 'सत्.' तो देव मंगलमय आहे. ती परिपूर्णता शिवस्वरूप आहे. तें जें सुंदर ध्येय आमच्या डोळ्यांसमोर दिसत आहे तें सत् आहे. कोठें आहे तें सत् रूप? तर उत्तर आहे, 'तत्' तें पहा. आमच्या डोळ्यांना स्पष्ट दिसत आहे. 'ॐ तत् सत्' या तीन शब्दांचा असा हा अर्थ आहे. न्यायमूर्ति रानडे एका व्याख्यानांत म्हणाले, "तो पहा हिंदुस्थान मला दिसत आहे. तेथें अन्न आहे, वस्त्र आहे, ज्ञान आहे; भांडणें नाहींत, रोग नाहींत, दुष्काळ नाहींत. सारे गुण्यागोविंदानें रहात आहेत. उत्तरोत्तर विकास करून घेत आहेत. असा तो हिंदुस्थान पहा. देवाची ही लाडकी भूमि पहा!" न्यायमूर्तींच्या या म्हणण्याचा अर्थ काय? ॐ तत् सत् हा त्याचा अर्थ. कोणतेंहि कार्य करावयास निघतांना "तें माझें ध्येय, तें परममंगल असें ध्येय" असें म्हणून उभे रहा, हा या ॐ तत् सत् याचा अर्थ. ही श्रद्धा, ही निष्ठा घेऊन उभे राहूं तरच कृतार्थ होऊं.

● ● ●

# अध्याय १८ वा

आणि आतां शेवटचा अध्याय. हा अध्याय म्हणजे उपसंहार. भगवान् सांगतात, " काम्य कर्मांचा त्याग तर करावयाचाच; परंतु जीं स्वधर्माचरणाचीं कर्में करावयाचीं त्यांच्या फळांचाहि त्याग करावयाचा." काम्य कर्में सारीं निषिद्धच. जीं कर्में मुद्दाम स्वार्थानें सुरू केलीं, तेथें फलत्याग संभवेल तरी कसा? आपल्या देशांतील कपड्यांचें दुकान घालणें हा स्वधर्म आहे; परंतु जवळचे लोक उपाशी मरत असतां परदेशांतील कापडाचें अधिक कमिशन मिळतें म्हणून दुकान घालणें, हें काम्य कर्म आहे. अशीं कर्में गीता निषिद्ध मानीत आहे. आणि जीं स्वधर्माचरणाचीं कर्में करावयाचीं, तींहि निष्कामबुद्धीनें करावयाचीं.

कर्म म्हटलें कीं थोडा तरी दोष त्यांत येतोच. अग्नीजवळ जसा धूर, तसा कर्माजवळ दोष. केवळ निर्दोष असें कर्म जगांत शक्य नाहीं. शेतीचें कर्म करतांना पायांखालीं किडे तुडवले जातात म्हणून जर शेतीचेंच कर्म टाळूं बघूं, तर लोक उपासमारीनें मरूं लागतील. एक दोष टाळूं जाल, तर दुसरा त्याहून मोठा पदरीं येईल. म्हणून ईश्वरार्पणबुद्धीनें कर्म करीत जा. शक्य तितकें निर्दोष कर्म व्हावें म्हणून खटपट करीत राहणें, एवढेंच आपल्या हातीं.

अशा रीतीनें निर्दोष कर्में करीत जातां जातां पूर्णता अंगीं बाणेल. केवळ निरहंकारी दशा अंगीं येईल. सर्वत्र आत्मरूप पहाल. आसक्ति नष्ट होईल. भेद दुरावतील. असा जो कर्मयोगी, निष्काम सेवक, त्यानें कांहीं केलें तरी मंगलच होतें. त्यानें मारलें तरी तें तारणें होतें. आई मुलाला मारते; परंतु मारतां मारतां स्वतः रडत असते. तें का मारणें असतें? ती मुलाला नसते मारीत. जणुं स्वतःलाच मारीत असते! संतांचें मारणें हें अशा प्रकारचें असतें. रवीन्द्रनाथांनीं म्हटलें आहे, " जो प्रेम करतो त्यालाच मारण्याचा अधिकार आहे." परंतु आपण आधीं मारण्याचा हक्क जणुं बजावूं पहात असतो. शिक्षक मुलाला छडी मारतो; परंतु प्रेम देतो का? आधीं प्रेम द्या आणि त्या प्रेमाच्या अधिकारावर शासन करण्याचाहि अधिकार हवा असेल तर मिळवा.

रामानें रावणास मारलें, कृष्णानें कंसास मारलें; मग आम्हीं कां मारूं

नये, असें आपण म्हणतों ; रामानें रावणास मारलें आणि रावण उद्धरून गेला असें आहे. आपण पहिलें वाक्य वाचलें, पुढचें पाहिलें नाहीं. एक मुसलमान होता. तो दारू पीत असे. त्याला कोणीं विचारलें, "अरे, दारू कां पितोस ? हें धर्माविरुद्ध आहे." तो म्हणाला, "कुराणांत दारू पी असें आहे." तो गृहस्थ म्हणाला, "दाखव रे !" त्यानें कुराण आणलें व दाखवलें. तो म्हणाला, "हें पहा. 'तूं दारू पी' असें येथें आहे." तो गृहस्थ म्हणाला, "अरे, पुढचें वाच कीं. 'तूं दारू पी, म्हणजे नरकाचा धनी होशील' असें आहे." तो म्हणाला, "त्या पुढच्या वाक्यापर्यंत अद्याप मी आलों नाहीं. जेवढें वाक्य वाचलें, तेवढ्याचा आचार सुरू केला !" तसें आपलें आहे. रामानें रावणास मारलें. लगेच आपण मारूं लागलों ! परंतु रामचंद्राचे ते निष्काम हात, ते परम कारुणिक हात, रावणाच्या कल्याणासाठीं तडफडणारे ते हात. म्हणून त्या हातांनीं मेलेला रावण तरला. आपले तसे हात आहेत का ? आपल्या हातांनीं मरणारा उद्धरून जाईल असें आपणांस म्हणतां येईल का ?

असो. जगाची सेवा करा. प्रेम करा. हें जग आनंदी होईल असें करा.

> **" अवघाची संसार सुखाचा करीन**
> **आनंदें भरीन तिन्ही लोक "**

हें ध्येय ठेवा. ज्ञानेश्वरांनीं वर मागितला :

> **जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥**

असें आपणहि म्हणूं या. त्यासाठीं लढूं या. धडपडूं या. अनासक्त वृत्तीनें उद्योगांत रात्रंदिवस रमूं या.

असें हें सांगून भगवान् अर्जुनाला म्हणाले, "अर्जुना, ऐकलेंस ना हें सारें गीताशास्त्र ? गेला का तुझा मोह ?"

> **" कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा**
> **कच्चिदज्ञानसंमोहः प्रणष्टस्ते धनंजय "**

तेव्हां अर्जुन उचंबळून म्हणाला :

> **" नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत "**

देवा, गेला हो मोह. जागृति आली. तुझी ही कृपा ! भगवान् अर्जुनाला म्हणाले, "मीं तुला सांगितलें खरें; परंतु तुझ्यावर लादीत नाहीं. तुझ्या विचारास येईल तसा तूं वाग. 'यथेच्छसि तथा कुरु.'"

गीतेचा हा मोठेपणा आहे. भगवंतांची ही उदारता आहे. सर्व सांगून पुन्हां ते आचारस्वातंत्र्य देतात, विचारस्वातंत्र्य देतात; परंतु भगवंतांचें अर्जुनावर अपार प्रेम! त्यांना रहावत नाहीं. दिलेलें स्वातंत्र्य ते पुन्हां घेतात व म्हणतात :

" सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज "

अर्जुना, सोड इतर सारे विचार. एक गोष्ट लक्षांत ठेव. तूं मला शरण ये. माझी इच्छा ती तूं तुझी स्वतःची कर. तुझी अशी निराळी इच्छा ठेवूंच नकोस.

आपण हा शेवटचा विचार सदैव ध्यानांत घ्यावा. समाजवाद का गांधीवाद, का कोणता वाद? कोणता धर्म? भगवान् म्हणतात, " सोड सारे धर्म व मला शरण ये!" कोणतेंहि कर्म करतांना आपण मनाला विचारावें, हें माझें कर्म देवाला आवडेल का? त्याच्या समोर हें माझें कर्म मी घेऊन जाऊं शकेन का?

माझ्या मनांत कधीं कधीं विचार येतो कीं घरांत एकादी वृद्ध आजीबाई असावी; तिच्या नातवंडांनीं तिच्या समोर कांदे, लसूण वगैरे नेऊन ठेवावे. ती आजीबाई म्हणेल, " हें रे काय आणतां? कांहीं न दिलेत तरी चालेल, मी उपाशी राहीन; परंतु असलें नका आणूं." असेंच तो पुराणपुरुष म्हणत असेल. ती जगन्माता आज हजारों वर्षें जणुं उपाशी आहे. तिला आवडणारा कर्ममेवा कोण देतो? म्हणून तर द्रौपदीच्या एका पानानें त्याला ढेकर आली. प्रभूला आपलीं कर्में आवडतील असें ज्याला म्हणतां येईल तो धन्य होय!

शेक्सपिअर या इंग्रज कवीनें म्हणून म्हटलें आहे कीं, " जें जें तूं करूं पाहशील तें देवासाठीं असो, सत्यासाठीं असो, तुझ्या देशासाठीं असो." शेक्सपिअरनें आधीं देश घेतला नाहीं. आधीं देव घेतला, सत्य घेतलें. इंग्रज आपल्या देशाची सेवा करीत आहेत; परंतु हिंदुस्थानची हलाखी करून स्वदेशाची त्यांनीं चालविलेली सेवा ही देवाघरीं रुजू होईल का? कधींहि नाहीं.

म्हणून आपल्या कर्मांना, मनांतील विचारांना एक कसोटी लावावी. त्या भगवंताच्या समोर हीं कर्में, हे विचार न्यायला मला लाज नाहीं ना वाटणार? त्याच्या समोर मान खालीं घालावी नाहीं ना लागणार? असें स्वतःला विचारावें. ईश्वराची इच्छा ती स्वतःची करावी. आपल्या कर्मांतून प्रभूचे हेतु प्रकट

करावेत. मी कोणी नाहीं. सारें तो. त्याचें संगीत माझ्यांतून स्रवूं दे. त्याच्या इच्छा माझ्यांतून मूर्त होऊं देत. त्याचे सूर माझ्या जीवनाच्या बांसरींतून बाहेर पडूं देत. त्याच्या हातांतील मी साधन. तो दादु पिंजारी पिंजणाचें काम करीत असे. पिंजणाची तार तुंइं तुंइं तुंइं करी. दादु पिंजाऱ्याला त्या तुंइं-तुंइं-मध्यें काय बरें ऐकायला येई? तो म्हणे, "देवा, तुंहि तुंहि तुंहि." तूंच केवळ आहेस!

● ● ●

ॐ तत्सत्